

# शारदीय नवरात्र

ले: अ. बा. मराठे

तुकाराम बुक डेपो, माधवबाग, मुं. ४

ॐ

# श्री शारदीय नवरात्र
# तथा
# श्री जगदंबेचा जयजयकार !

या देवी सर्व भूतेषु श्रद्धारूपेण संस्थिता ।
नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमोनमः ॥ १ ॥
जयन्ती मङ्गला काली भद्रकाली कपालिनी ।
दुर्गा क्षमा शिवा धात्री स्वाहा स्वधा नमोऽस्तुते ॥ २ ॥

: लेखक :
अनंत वासुदेव मराठे

तुकाराम बुक डेपो, माधवबाग, मुंबई ४

शाके १८८४ किंमत ७ रुपये सन १९६२

# अनुक्रमणिका

## भाग १ ला



## भाग २ रा

## ( पूजाविधि )

आरत्या



---

# शारदीय नवरात्र

## भाग पहिला

*******************************************************

### १ श्रीदेवीनवरात्र व त्याचा हेतु

आश्विन शुक्ल पक्षांतील नवरात्र हें एक व्रत असून हा व्रतोत्सव प्रतिवर्षी शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत चालतो. यांत **श्रीमहाकाली–महालक्ष्मी–महासरस्वती** या त्रिशक्तींची आराधना मुख्य असते. या त्रिशक्तींत **श्रीमहालक्ष्मी** ही मुख्य देवी असून **महाकाली** व **महासरस्वती** ह्रीं तिची प्रासंगिक रूपें आहेत.

चंडिका, भद्रा, अंबिका, भद्रकाली इ. ह्रीं या महालक्ष्मीचींच दुसरी नांवें किंवा तिचे अंशावतार असून महामाया, महामारी, एकवीरा इ. ह्रीं महाकालीचीं व महाविद्या, महावाणी, भारती, सुरेश्वरी इत्यादि ह्रीं महासरस्वतीचीं विशिष्टगुणदर्शक नांवें किंवा त्यांचे अंशावतार आहेत.

चंडिका, भगवती, दुर्गा, शर्वी इत्यादि नांवेंही याच त्रिशक्तींचीं विशिष्ट गुणदर्शक नांवें असून त्रिपुरा, भुवनेश्वरी, भैरवी, श्यामा, ललिता, चंडी, चामुंडा, शांतादुर्गा इत्यादि आणखी कितीतरी नांवांनीं या देवि प्रसिद्ध आहेत. आणि त्या बहुतेक उग्रस्वरूपी आहेत.

बंगाल्यांत ‘दुर्गा’ आणि ‘कालीमाता’ या अतिप्रसिद्ध देवता असून तिकडे हा उत्सव आश्विन शु॥ १ पासून पौर्णिमेपर्यंत चालतो. बंगाली लोकांचा हा राष्ट्रीय उत्सव आहे. त्यांत सर्व जातींचे लोक सारख्याच उत्साहानें भाग घेतात.

महाराष्ट्रांतही श्रीदुर्गा—शांतादुर्गा—नवदुर्गा ही पुष्कळ कुटुंबांची कुलदेवता आहे. त्याचप्रमाणें विंध्यवासिनी, तुळजाभवानी, भद्रकाली (भराडी) माउली, भगवती इत्यादि देवींचीं देवालयें महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं आहेत. कोंकणांत शांतादुर्गा अथवा सातेरी या देवीचें देवालय अनेक गांवांत आढळून येतें. आणि या सर्व देवालयांतून हा उत्सव गांवकरी मोठ्या भक्तिभावानें करतात. +

या त्रिशक्तींविषयीं पुराणांतून असेंही सांगितलें आहे कीं श्री. महाकाली ही तमोगुणी असून तिचा अवतार मुख्यतः 'मधुकैटभ' या राक्षसाच्या नाशासाठीं झाला होता. तिला दहा मुखें, दहा हात, दहा पाय नि तीस डोळे असून तिची कांति काजळासारखी होती. तिच्या हातांत तलवार, बाण, गदा, शूल, शंख, चक्र, भुशुंडी, परिघ, धनुष्य हीं आयुधें असून रक्त गळणारें राक्षसाचें मस्तकही तिच्या हातांत असतें. श्रीमहालक्ष्मी ही रजोगुणी देवता 'महिषासुरमर्दिनी' म्हणजे मुख्यतः 'महिषासुर' राक्षसाला मारण्यासाठीं उत्पन्न झालेली असून तिला अठरा हात व रुद्राक्षांची माळ, कमळ, बाण, तलवार, वज्र, गदा, चक्र, त्रिशूळ, कुऱ्हाड, शंख, घंटा, पाश, शक्तिदंड, ढाल, धनुष्य, मद्य पिण्याचें पात्र * आणि कमंडलु अशा वस्तू तिच्या हातांत होत्या. तिचें मुख गोर, बाहू निळे आणि कमर व पाय तांबड्या रंगाचे होते.

---

+ झांशीच्या रणशूर राणीची श्रीमहालक्ष्मी ही कुलदेवता होती. श्री. तुळजाभवानी ही शिवछत्रपतींची व रामदासस्वामींचीही कुलदेवता होती.

* देवीच्या उपासनेंत श्री देवीला मद्यमांसाचा नैवेद्य दाखविण्याची व प्रसाद म्हणून तो भक्षण करण्याची जी रूढि कित्येक ठिकाणीं दिसून येते ती देवीच्या राक्षसांशीं झालेल्या युद्धांत तिनें स्वतः मद्याचें सेवन केल्याचें तिच्या महात्म्यांत वर्णन आहे त्यावरून पडलेली असावी.

श्रीसरस्वती हीं मूलतः सत्त्वगुणी असून गौरीच्या देहापासून ‘शुंभासुरा’ला मारण्यासाठींच उत्पन्न झाली. ती अष्टभुजा असून बाण, मुसळ, शूल, चक्र, शंख, घंटा, नांगर आणि धनुष्य हीं तिच्या हातांतील आयुधें होत.

या नवरात्राच्या नऊ दिवसांपैकीं पंचमीच्या दिवशीं कित्येक कुटुंबांत ‘उपांग ललिता’ नामक देवीचें व्रत आचरिलें जातें. तसेंच मूळ नक्षत्रीं सरस्वती देवीचें आवाहन, पूर्वाषाढा नक्षत्रीं पूजा, उत्तराषाढा नक्षत्रीं बलिदान आणि श्रवण नक्षत्रीं देवीचें विसर्जन असे विशेष विधि कित्येक कुटुंबांत रूढ आहेत. अष्टमी नि नवमी या तिथींना महातिथी म्हणतात. अष्टमीच्या दिवशीं महाराष्ट्रीय चित्तपावन कुटुंबांत श्रीमहालक्ष्मीच्या पिष्ठमय मूर्तीची पूजा करतात आणि नवमी ही ‘खांडेनवमी’ या नावाने प्रसिद्ध असून त्या दिवशीं शस्त्रपूजा केली जाते.

पूर्वी देव–दानवांच्या युद्धप्रसंगीं या शक्तिदेवींनी देवांचें म्हणजे सत्त्वगुणी व्यक्तींचें राज्य–दानवांचा वध करून–पृथ्वीवर नि स्वर्गांत घडवून आणलें होतें. तेव्हां त्यांचें निरंतर स्मरण रहावें आणि त्यांच्या उपासनेनें इहलोकीं अभ्युदय आणि परलोकीं निःश्रेयस ( मोक्ष ) यांचा मार्ग आपल्याला स्पष्ट दिसावा असा या उत्सवाचा मूळ हेतु आहे.

# २ त्रिशक्तींचें कार्य

## [ १ ]

### श्रीमहालक्ष्मी

महिषासुर या नांवाचा एक दैत्य होता. त्याचें धड रेड्यासारखें नि तोंड माणसासारखें पण उग्र होतें. म्हणून त्यास महिषासुर म्हणत. त्याचें राक्षससैन्य मोठें बलवान् असून त्याच्या सेनापतींत चिक्षुर, चामर, उदग्र, बाष्कल, ताम्र, अंधक, इत्यादि पराक्रमी राक्षसवीर त्याच्याच तोडीचे होते.

देव-दानवांच्या युद्धांत एकदा या महिषासुरानें सर्व देवांचा पराभव करून देवांचा राजा इंद्र यालाही इंद्रलोकांतून हाकलून लावलें व स्वतःच इंद्रपद धारण केलें! तेव्हां सारे देव ब्रह्मदेवाला पुढारी करून शंकर व विष्णूकडे गेले. आणि त्यांनीं त्यांना सांगितलें "बाबांनो, स्वस्थ काय बसलां? सूर्य, इंद्र, अग्नि, वायु, चंद्र, यम, वरुण इत्यादि सर्व देवांचे अधिकार महिषासुर बळकावून बसला आहे, आणि स्वर्गांतून हाकलून दिलेले देव आतां मृत्युलोकांत सामान्य माणसांप्रमाणें जीवन कंठीत आहेत. तेव्हां या राक्षसांचा वध करण्याचा कांहीं तरी मार्ग काढा."

त्यांचें हें भाषण ऐकून शंकर व विष्णु विचार करूं लागले. इतक्यांत काय चमत्कार सांगावा? एकाएकीं तिथें एक प्रखर तेजाची रास उत्पन्न झाली आणि तींतून एक स्त्री बाहेर पडली. तिच्या कांतीनें त्रैलोक्य व्यापून गेलें!

या स्त्रीच्या हातांत तलवार, धनुष्य, शूल, चक्र, शक्ति, वज्र, पाश, परशु इत्यादि शस्त्रें होतीं, आणि अंगाखांद्यावरही नाना प्रकारचे तेजस्वी अलंकार होते.

तिचा आवाज घोर होता. त्या आवाजानें सर्व आकाश भरून गेलें, समुद्र खवळला, पृथ्वी कंपित झाली आणि तिच्यावरचे पर्वतही डळमळूं लागले!

महिषासुराच्या राक्षससैन्यानें हा प्रकार पाहिला तेव्हां तेही चकित झाले, पण ते गडबडले नाहींत. त्यांनीं आपली शस्त्रास्त्रें सावरून या भयंकर देवीशी युद्ध करण्याची तयारी केली आणि उभयतांचें युद्ध जुंपलें.

परस्परांनीं सोडलेल्या अनेक प्रकारच्या शस्त्रास्त्रांनीं सर्व दिशा व अंतरिक्ष प्रदेश चकाकूं लागला.

या वेळीं देवी रणांगणांत युद्ध करीत असतां जे सुस्कारे सोडीत असे त्या सुस्काऱ्यांपासून तत्काळ देवीचे हजारों गण उत्पन्न होत आणि ते

कुऱ्हाडी, गोफणी, पट्टे इत्यादि शस्त्रें घेऊन राक्षसांशीं लढून त्यांचा नाश करीत.

अशा रीतीनें हें तुंबळ युद्ध बरेच दिवस चाललें होतें. देवीच्या नाना प्रकारच्या शस्त्रांनीं राक्षसांचा संहार केला आणि रणांगणावर रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या. *

शेवटीं महिषासुर स्वतः देवीशीं लढण्यासाठीं पुढें झाला. त्यानें देवीच्या कित्येक गणांना तोंडाच्या प्रहारानें, कित्येकांना पायांच्या खुरांनीं कित्येकांना शेपटीनें तर कित्येकांना शिंगानींही मारून टाकलें! आणि नंतर तो देवीच्या अंगावर धावून गेला.

देवीनें त्याला मारण्यासाठीं त्याच्या अंगावर पाश टाकून त्याला बांधलें. पण महिषासुर बलवान् होता तसाच मायावी—म्हणजे नाना प्रकारची रूपें घेण्यांतही प्रवीण होता. त्यानें तत्काल रेड्याचें रूप टाकून सिंहाचें रूप धारण केलें. देवीनें त्याचें मस्तक तोडण्यासाठीं तरवार उपसली तोंच तो सिंह नसून एका हातांत तलवार व दुसऱ्या हातांत ढाल घेतलेला पुरुष आहे असें तिला दिसलें!

---

* श्री देवी महात्म्यांत या तुंबळ युद्धाचें वर्णन करतांना म्हटलें आहे:– " केषांचित्बाहवश्छिन्नाश्छिन्नग्रीवास्तथापरे । शिरांसिपेतुरन्येषामन्येमध्ये-विदारिताः ॥ १ ॥ विच्छिन्नजङ्घस्त्वपरेपेतुरुर्व्यांमहासुराः । एकबाव्हक्षिचरणाः केचिद्देव्याद्विधा कृताः ॥ २ ॥ शोणितौघामहानद्यः सद्यस्तत्र प्रसुस्त्रुवुः । मध्येचासुरसैन्यस्यवारणासुरवाजिनाम् ॥ ३ ॥" म्हणजे "या राक्षसांपैकीं कोणाचे हात तुटले, कोणाच्या माना तुटल्या, कोणाचीं डोकीं फुटून पडलीं, कोणी मधोमध कापले गेले, कोणाच्या मांड्याच तुटून ते पृथ्वीवर पडले. कांहीं राक्षस देवीनें उभे चिरले, त्यामुळें एकच हात, एकच डोळा व एकच पाय असलेले असे प्रत्येकाचे दोन दोन तुकडे झाले आणि तेथें राक्षससैन्यां-तील हत्ती, राक्षससैनिक व घोडे वगैरेंच्या प्रचंड वेगवान् नद्याच वाहूं लागल्या. इ०"

देवीनें आपल्या भात्यांतून बाण बाहेर काढले तों त्या महिषासुरानें हत्तीचें रूप धारण केलें आणि आपल्या सोंडेनें देवीचें वाहन जो सिंह त्यालाच तो खेंचू लागला. देवीनें त्या हत्तीची सोंड तलवारीनें छाटून टाकली तेंव्हां त्यानें पुनः रेड्याचें रूप धारण केलें आणि आपल्या शिंगांनीं पर्वतचे पर्वत उचलून देवीवर फेंकू लागला. पण देवीही असावध नव्हती. ती एकदम उडी मारून त्या राक्षसाच्या अंगावर चढली आणि त्याच्या मानेवर पाय देऊन शूलानें त्याच्या अंगावर प्रहार करूं लागली.

महिषासुरही अखेरची धडपड करून वर उठण्याचा प्रयत्न करूं लागला. पण देवीनें आपल्या हातांतल्या तीक्ष्ण तलवारीनें त्याचें मस्तक तोडून त्याला खालीं पाडलें!

मग काय विचारतां! देवांना अत्यंत हर्ष होऊन ते देवीची स्तुति करूं लागले.

**देव्या यया ततमिदं जगदात्मशक्त्या।**
**निःशेष देवगणशक्ति समूह मूर्त्या॥**
**तामम्बिकामखिलदेव महर्षि पूज्यां।**
**भक्त्या नताःस्म विदधातु शुभानि सा नः॥ १॥**

**या श्रीःस्वयं सुकृतिनां भवनेष्वलक्ष्मीः।**
**पापात्मनां कृतधियां हृदयेषु बुद्धिः॥**
**श्रद्धा सतां कुलजनप्रभवस्य लज्जा।**
**तां त्वां न ताः स्म परिपालय देवि विश्वम्॥ २॥**

**हेतुः समस्त जगतां त्रिगुणापि दोषै।**
**र्न ज्ञायसे हरिहरादिभिरप्य पारा॥**
**सर्वाश्रयाऽखिलमिदं जगदंश भूत-।**
**मव्याकृता हि परमा प्रकृतिस्त्वमाद्या॥ ३॥**

मेधाऽसि देवि विदिताखिलशास्त्रसारा ।
दुर्गाऽसिदुर्गभवसागरनौरसङ्गा ॥
श्रीः कैटभारी हृदयैककृताधिवासा ।
गौरी त्वमेव शशिमौलिकृतप्रतिष्ठा ॥ ४ ॥
देवि प्रसीद परमाभवती भवाय ।
सद्यो विनाशयसि कोपवती कुलानि ॥
विज्ञातमेतदधुनैव यदस्तमेत—।
न्नीतं बलं सुविपुलं महिषासुरस्य ॥ ५ ॥
ते संमता जनपदेषु धनानि तेषां ।
तेषां यशांसि नच सीदति बन्धुवर्गः ॥
धन्यास्त एव निभृतात्मज भृत्यदारा ।
येषांसदाऽभ्युदयदा भवती प्रसन्ना ॥ ६ ॥
दुर्गे स्मृता हरसि भीतिमशेष जन्तोः ।
स्वस्थैः स्मृता मतिमतीव शुभां ददासि ॥
दारिद्र्यदुःखभयहारिणि का त्वदन्या ।
सर्वोपकारकरणाय सदाऽऽर्द्रचित्ता ॥ ७ ॥
त्रैलोक्यमेतदखिलं रिपुनाशनेन ।
त्रातं त्वया समरमूर्धनि तेऽपि हत्वा ॥
नीता दिवं रिपुगणा भयमप्यपास्त—।
मस्माकमुन्मद सुरारिभवं नमस्ते ॥ ८ ॥

देवांच्या या स्तवनानें देवीही प्रसन्न होऊन देवांना म्हणाली, "देवहो! माझ्यापासून जें कांहीं तुम्ही मागूं इच्छितां तें मागा." देव म्हणाले, "भगवती देवीनें सर्व कांहीं केलें आहे. पण जर तुझ्या मनांतून आम्हांला

कांहीं वर द्यावयाचा असेल तर हा दे की, आम्ही तुझें स्मरण केलें किंवा न केलें तरी देखील तूं आमच्या विपत्ति नाहींशा कर आणि आम्ही केलेल्या या स्त्रोत्रांनीं जो मनुष्य तुझें स्तवन करील त्याचें द्रव्य, ऐश्वर्य, वैभव, धन, स्त्री इत्यादि संपदेची वृद्धि कर."

त्यावर 'तथास्तु!' म्हणजे 'ठीक आहे; तसें होवो!' असें म्हणून देवी गुप्त झाली.

## [ २ ]

## श्रीमहाकाली

मधु-कैटभ या नांवाचे दोन दैत्य होते. ते श्रीविष्णूच्या कानांतील मळापासून उत्पन्न झाले होते. उपजतांच ते ब्रह्मदेवाला मारायला धावले. ब्रह्मदेव श्रीविष्णूच्या नाभिकमलांत बसलेला होता. श्रीविष्णूही त्या वेळीं योगनिद्रेंत गढून गेले होते.

ब्रह्मदेवाला काय करावें सुचेना. पण तितक्यांत त्यानें श्रीविष्णूच्या डोळ्यांत दिसणाऱ्या योगनिद्रेलाच प्रसन्न करण्याचें ठरविलें आणि त्यानें तिची प्रार्थना केली कीं "तुझ्याकडूनच विश्वाचें धारणपोषाण केलें जातें. तुझ्यापासूनच जग उत्पन्न झालें आहे. तुझ्याकडूनच या जगाचें पालन केलें जातें आणि तूंच या जगाचा नेहमीं संहार करतेस. तूंच महाविद्या, महामाया, महाबुद्धि व महास्मृति आहेस. तूंच महा-देवी व महेश्वरी आहेस. तूं तलवार धारण करणारी, शूल धारण करणारी व फार भयंकर स्वरूपाची आहेस. तूं गदा, चक्र, शंख, धनुष्य, बाण, भुशुंडी व परीघ हीं शस्त्रें धारण करणारी आहेस. जो ही सृष्टि उत्पन्न करतो, या सृष्टीचें पालन करतो व या जगाचा संहार करतो तो परमेश्वरही ज्या तुझ्यामुळें योगनिद्रावश झाला त्या तुझें स्तवन करण्याला कोण समर्थ आहे? तूं असाधारण पराक्रमांनीं

युक्त आहेस. तेव्हां आतां अत्यंत भयंकर अशा या मधु-कैटभ दैत्यांना मोहून टाक." +

ही योगनिद्रादेवी तामसी स्वरूपी होती. ब्रह्मदेवाची स्तुति ऐकून ती श्रीविष्णूच्या नेत्रांतून निघाली नि ब्रह्मदेवासमोर साकार स्वरूपांत येऊन उभी राहिली...अर्थात् श्रीविष्णुही योगनिद्रेंतून जागे होऊन शेषशय्ये-वरून उठले, तों त्यांना ते दोन्ही राक्षस दिसले.

श्रीविष्णुचें नि त्या दोन्ही राक्षसांचें युद्ध झालें. पण अशा समर-प्रसंगीं पुष्कळ वेळां घडून येतें त्याप्रमाणेंच याही वेळीं घडून आलें.

श्रीविष्णूचा जय कांहीं होईना. पण आतां ती योगमाया त्यांच्या मदतीला होती. तिनें त्या दैत्यांना मोहांत पाडलें. तेव्हां ते श्रीविष्णुला म्हणाले:—"विष्णो, आम्ही तुझे मुलगे तुझ्यावर संतुष्ट आहों. तुला पाहिजे तो वर आमच्यापासून मागून घे!"

श्रीविष्णु म्हणाले:—"तुम्ही माझ्यावर जर खरेच संतुष्ट झाले असाल तर दोघांनीही माझ्याकडून मृत्यु पावावें असा वर मला द्या!"

इतक्यांत सर्व सृष्टि जलमय झालेली त्या राक्षसांना दिसली. तेव्हां ते म्हणाले:—"बरें तर. पृथ्वीचा जो भाग पाण्यानें भरलेला नसेल तिथें आमचा वध कर...."

असें सांगतांच श्रीविष्णूनें आपलें चक्र सोडून त्यांच्या मांड्या व मस्तक हीं तोडून टाकलीं.

हें अर्थातच त्या योगनिद्रेच्या मायेनें घडून आलें.

---

+ खड्गं चक्रगदेषुचाप परिघान् शूलं भुशुंडीं शिरः
शंखं संदधतीं करैस्त्रिनयनां सर्वांगभूषावृताम् ॥
नीलाश्मद्युतिमास्यपाददशकां सेवे महाकालिकाम् ।
यामस्तौत् स्वपिते हरौ कमलजो हन्तुं मधुं कैटभम् ॥१॥
(-स. श.)

# [ ३ ]

## श्रीमहासरस्वती

शुंभ व निशुंभ असे दोन दैत्य होते. त्यांनीं एकदां इंद्राचें राज्य हरण करून सर्व देवांना तिथून हाकून लावलें. तेव्हां देव हिमालय पर्वतावर गेले नि त्यांनीं 'अपराजिता' देवीची प्रार्थना केली कीं "हे देवि, पूर्वी महिषासुराला मारण्यासाठीं तूंच अवतार घेतला होतास; तसा आतांही अवतार घेऊन आमचें रक्षण कर नि आमचें राज्य आम्हांला परत मिळवून दे."

इतक्यांत असा चमत्कार झाला कीं शंकर-पत्नी पार्वती तिथेंच प्रगट झाली आणि तिच्या शरीरांतून 'शिवा' व 'अंबिका' अशा दोन देवी उत्पन्न झाल्या. अंबिका ही पार्वतीच्या बाह्य शरीरकोशापासून उत्पन्न झाल्यामुळें तिला 'कौशिकी' असें नांव पडलें आणि त्याच वेळीं खुद्द पार्वतीचा रंग काळा झाल्यामुळें तिला 'कालिका' असें नांव पडलें.

इकडे शुंभ-निशुंभांचे 'चंड' व 'मुंड' असे दोन सेवक होते. त्यांनीं कौशिकीला पाहिलें आणि शुंभाला येऊन सांगितलें कीं "हिमालय पर्वताला प्रकाशित करणारी एक स्त्री तिथें आम्हीं पाहिली. तिच्या सौंदर्याचें वर्णन काय करावें? ती आपल्या कांतीनें सर्व दिशा प्रकाशित करीत आहे, एवढ्यांतच काय तें समजा."

शुंभाच्या वाड्यांत रत्नें, ऐरावत, उच्चैःश्रवा, पारिजात इ. देवलोकांतील सारी संपत्ति येऊन पडलीच होती. त्यांत या स्त्रीरत्नाची भर घालावी असें त्याच्या मनानें घेतलें आणि त्यानें 'सुग्रीव' या नांवाच्या आपल्या दूताला तिच्याकडे पाठविलें.

हा दूत कौशिकीकडे जाऊन म्हणाला:—"आमच्या शुंभानें साऱ्या देवांना जिंकलें असून सध्या इंद्रलोकाचेंच नव्हे तर त्रैलोक्याचें राज्यही

तोच करीत आहे. तूं त्याच्याकडे येऊन त्याला वरशील तर तुला तुझ्या रूपाला साजेल असा पति मिळून अतुल ऐश्वर्यही प्राप्त होईल. ”

देवी कौशिकी मनांत म्हणाली, याच्याशी सरळ बोलून उपयोग नाहीं; इथें कपटाचाच अवलंब केला पाहिजे. असा विचार करून ती त्या दूताला म्हणाली, “ तूं म्हणतोस ते सर्व ठीक आहे. पण मी पूर्वी एकदां अज्ञानानें अशी प्रतिज्ञा करून चुकलें आहे कीं जो मला रणांगणांत जिंकील—जो माझ्यासारखाच बलशाली असेल—त्यालाच मी पति करीन. तेव्हां त्या शुंभाला इकडे येऊं दे. त्यानें मला जिंकलें कीं मी त्याला वरीन. ”

दूतानें शुंभाकडे परत येऊन देवीचा निरोप त्याला सांगितला. अर्थात शुंभ क्रोधानें लाल झाला. पण एका स्त्रीशीं युद्ध करणें हें कमीपणाचें वाटून त्यानें आपला सेनापति धूम्रलोचन ह्यास हिमालयावर पाठविलें. त्याला आज्ञा केली होती कीं ती स्त्री आपण होऊन इकडे न येईल तर तिचे केंस धरून तिला फरफटत ओढून घेऊन ये !

शुंभाच्या आज्ञेप्रमाणें धूम्रलोचन निघाला तो तडक हिमालयावर गेला. त्याच्याबरोबर राक्षससैन्यही होतेंच. त्यानें कौशिकी—अंबिका देवीला सांगितलें कीं, तुला शुंभ दैत्य आपली पट्टराणी करूं इच्छितो. तेव्हां मुकाट्यानें माझ्याबरोबर ये. नाहीं तर तुझे केंस धरून ओढून आणण्याची मला आज्ञा आहे !

देवी म्हणाली, “ अस्सं ! खरंच, तूं बलवान् असून बलात्कारानं मला नेणार एकूण ! पण प्रथम मला असं सांग कीं, तुला कोणत्या प्रकारानं मारूं ? ”

देवीचें हें उपहासाचें भाषण ऐकून धूम्रलोचन अतिशय रागावला आणि त्यानें एकदम अंबिकेच्या अंगावर उडी घेतली. पण अंबिकेनें

*

नुसत्या हुंकारानेंच त्याचें भस्म केलें आणि त्याचें राक्षससैन्य मागाहून धावून आलें त्याचा अंबिकेचें वाहन जो सिंह त्यानें फडशा पाडला!

धूम्रलोचनाच्या मागून चंड-मुंड हे शुंभाचे दूत अंबिकेशी लढायला आले. त्यांनींही अंबिकेला मागें सांगितलेलाच शुंभाचा निरोप सांगितला. आणि आपापली शस्त्रें परजून ते देवीच्या अंगावर धावून गेले.

अंबिका यावेळीं अतिशय कोपली होती, रागानें तिचें मुख लाल झालें होतें. तिच्या भुवया वांकड्या झाल्या होत्या. त्या भुंवया आणि कपाळ यांपासून एकाएकीं ' काली ' नांवाची भयानकमुखी देवी उत्पन्न झाली. तिच्या हातांत तलवार होती. मनुष्यांच्या मस्तकांची माळ तिनें भूषण म्हणून गळ्यांत घातली होती. हत्तीचें कातडें तिनें पांघरलें होतें. तिची जीभ लवलव करीत होती. आणि तिच्या लाल भडक डोळ्यांतून अग्निवर्षाव चालला होता.

उपजतांच तिनें जी गर्जना केली तिनें दशदिशा दणाणून गेल्या आणि ती राक्षससैन्यांत शिरली ती एकेका राक्षसाला उचलून तोंडांतच टाकूं लागली!

हत्तीवर मध्यभागी बसलेला योद्धा, पुढें बसलेला महात आणि मागें बसलेले संरक्षक वीर यांसह हत्ती अलग उचलून ती तोंडांत टाकी. तीच गत घोड्यांसह स्वारांची नि सारथ्यासह रथांची!

अशा रीतीनें अनेक राक्षसांचा तिनें संहार केला. तेव्हां चंड तिच्या अंगावर धावून गेला आणि मागाहून मुंडही हजारों चक्रें सोडून तिला मारायला धांवला. पण कालीनें चंडाचे केंस धरून तलवारीनें त्याचें मस्तक छाटलें आणि मुंडालाही तलवारीनें वार करून भूमीवर पाडलें.

चंड-मुंड दोघेही अशा रीतीनें मारले गेले; तेव्हां उरलें सुरलें राक्षस-सैन्य भयभीत होऊन दशदिशा पळत सुटलें. नंतर काली चंडमुंडांची

मस्तकें घेऊन गर्जना करीत अंबिका देवीकडे गेली आणि तिला म्हणाली, "हे पहा चंड-मुंड हे दोन पशु मी तुझ्याकरतां आणले आहेत. आतां शुंभ-निशुंभांचा समाचार तूंच घे!"

अंबिका प्रसन्न झाली नि कालीला म्हणाली: "ज्या अर्थी चंड-मुंडांना घेऊन तूं इथें आलीस त्या अर्थी लोकांत तूं "चामुंडा या नांवानें प्रख्यात होशील."

आपल्या चंड-मुंड या बलवान दूतांचा नाश झाल्यानें शुंभ-निशुंभ अधिकच क्रोधाविष्ट झाले आणि 'कंबु' 'कांतिवीर्य' 'धौम्र' 'कालक' 'मौर्व' 'कार्तिकेय' इत्यादि आपल्या हस्तकांना बरोबर घेऊन ते चंडिकेशीं लढण्यास निघाले.

अंबिका नि काली तयारच होत्या. ब्रह्मदेव, शंकर, षडानन, विष्णु, इंद्र इत्यादि देवांनीही आपापल्या अंगांतील शक्तींना मूर्त स्वरूप देऊन त्यांच्या मदतीला पाठविलें.

ब्रह्मदेवाची 'ब्रह्माणी', 'शंकराची 'महेश्वरी', कार्तिकस्वामीची (षडाननाची) 'कौमारी', विष्णूची 'वैष्णवी', नृसिंहाची 'नारसिंही' इत्यादि साऱ्या शक्तिदेवता तिथें प्रगट झाल्या.

नंतर 'अपराजिते'नें शंकरालाच सांगितलें कीं "तुम्हीं माझे दूत होऊन शुंभ-निशुंभांकडे जा आणि त्यांना सांगा कीं, 'तुम्हांला जिवंत रहायचें असेल तर इंद्राला त्याचें राज्य देऊन टाका नि तुम्ही पाताळांत जाऊन रहा.'

पण ते राक्षस शंकराचें थोडेंच ऐकतात! ते या निरोपानें अधिकच चिडले आणि ताबडतोब त्या कात्यायनी देवीकडे येऊन समोरून बाण, शक्ति, तलवारी यांचा मारा करूं लागले.

कौशिकी व काली याही उलट मारा करूं लागल्या. त्यांच्या मदतीला वर सांगितलेल्या ब्रह्मदेवादिकांच्या इतर शक्तिदेवताही होत्याच.

या युद्धांत राक्षसांच्या बाजूनें रक्तबीज नांवाचा एक राक्षस होता. त्याचें वैशिष्टय असें होतें कीं, त्याच्या शरीरापासून रक्ताचा थेंब जेव्हां भूमीवर पडे तेव्हां त्या थेंबापासून त्या राक्षसासारखाच मोठा राक्षस पृथ्वीवर उत्पन्न होई !

पण त्यावर देवींच्या बाजूच्या काली देवीनेंही पुढें तोड काढली ती अशी कीं, त्या रक्त-राक्षसांच्या अंगावर प्रहार न करतां त्यांना आपल्या विशाल तोंडांत घेऊनच गिळून टाकावयाचें ! आणि कौशिकी रक्तबीजावर प्रहार करूं लागली कीं त्याच्या अंगांतून निघणारें रक्त जमिनीवर पडूं न देतां तेंही पिऊन टाकावयाचें !

अशा रीतीनें तो राक्षस शेवटीं रक्तहीन होऊन भूमीवर पडला आणि गतप्राण झाला.

त्यानंतर शुंभ-निशुंभ या खाशा स्वाऱ्यांचें अंबिकेशीं युद्ध झालें. उभयतांनीं परस्परांवर अनेक शस्त्रास्त्रांचा मारा केला. शेवटीं प्रथम निशुंभ मरून भूमीवर पडला आणि मागाहून अंबिकेचें नि शुंभाचें द्वंद्वयुद्ध होऊन शुंभाचीही तीच गत झाली !

शुंभ-निशुंभांचा अंत झाल्यावर देवांना झालेला हर्ष काय वर्णावा ? त्यांनीं विमानांतून पुष्पवृष्टि करून या कात्यायनी देवीची प्रार्थना केली:—

**विद्याः समस्तास्तव देवि भेदाः ।**
**स्त्रियः समस्ताः सकला जगत्सु ॥**
**त्वयैकया पूरितमम्बयैतत् ।**
**का ते स्तुतिः स्तव्यपरापरोक्तिः ॥ १ ॥**
**रोगानशेषानपहंसि तुष्टा ।**
**रुष्टातु कामान् सकलानभीष्टान् ॥**
**त्वामाश्रितानां न विपन्नराणाम् ।**
**त्वामाश्रिता ह्याश्रयतां प्रयान्ति ॥ २ ॥**

विद्यासु शास्त्रेषु विवेकदीपे- ।
ष्वाद्येषु वाक्येषु च का त्वदन्या ।।
ममत्वगर्तेऽति महान्धकारे ।
विभ्रामयस्यं तदतीव विश्वम् ।। ३ ।।
रक्षांसि यत्रोग्रविषाश्च नागा ।
यत्रारयो दस्युबलानि यत्र ।।
दावानलो यत्र तथाऽब्धिमध्ये ।
तत्र स्थिता त्वं परियासि विश्वम् ।। ४ ।।
विश्वेश्वरि त्वं परिपासि विश्वम् ।
विश्वात्मिका धारयसीह विश्वम् ।।
विश्वेशवंद्या भवती भवन्ति ।
विश्वाश्रया ये त्वयि भक्तिनम्राः ।। ५ ।।

देवीही देवांवर प्रसन्न होऊन म्हणाली "मी तुम्हाला वर देण्यास तयार आहे. जगाला उपकारक होणारा कोणताही वर मागा" देव म्हणाले, **"जगाच्या सर्व दुःखांचें शमन आणि आमच्या शत्रूंचा नाश एवढें कार्य तूं करीत रहा म्हणजे झालें."**

देवी म्हणाली:- "मी आतांच शुंभ-निशुंभांचा आणि त्यांच्या राक्षसगणांचा नाश केला आहे खरा; पण ते पुनः या पृथ्वीवर जन्म घेऊन सज्जनांना उपद्रव देणार नाहींत असें नाहीं. पण मीही त्यांचा नाश करण्यासाठीं जरूर तितके अवतार घेईन. त्या वेळीं **माझीं रूपें वेगवेगळीं असलीं तरी त्या सर्वांत वावरणारी शक्ति एकच असेल.**"

## २ या कथांपासून घ्यावयाचा बोध

सामान्यतः देव-दानवांच्या युद्धांत असें दिसून येतें कीं देव हे सुसंस्कृत व म्हणूनच सत्वगुणप्रधान असल्यामुळें आडदांड तामसी

दानवांप्रमाणें एकदम आक्रमक बनून क्रूर कर्में करण्यास प्रवृत्त होत नाहींत. पण याचा परिणाम असा होतो कीं आपल्या पाशवी शक्तीच्या जोरावर हे क्रूर व विवेकहीन दानव सारे नीतिनियम बाजूला ठेवून देवांच्या मागें लागतात नि अनन्वित कृत्यें करतात. अशा वेळीं देवांची संस्कृतीच नष्ट होण्याचा प्रसंग येतो. तेव्हां मग देवांना या क्रूरकर्म्यांपासून स्वतःचा व स्वतःच्या संस्कृतीचा बचाव करण्यासाठीं जशास तसें वागून त्यांचा वध घडवून आणणें भाग पडतें. पण ते स्वतः दानवांपेक्षां शरीरबलांत दुबळे असल्यामुळें शक्तीपेक्षां युक्तीवरच भर देऊन व दानवांच्या शस्त्रांपेक्षां अधिक प्रभावी अशीं शस्त्रें निर्माण करून त्यांना हें कार्य करावें लागतें आणि शेवटीं 'बुद्धिर्यस्य बलं तस्य' हेंच तत्त्व सिद्ध होतें.

या कथांपासून दुसरा बोध घ्यावयाचा तो असा कीं, दानवांचा म्हणजे अदूरदर्शी आडदांड क्रूरकर्म्यांचा प्रथम जय झालासा दिसला तरी तो जय टिकावू नसतो. सत्त्वगुण हाच शेवटीं तमोगुणावर मात करून विजय मिळवितो. मात्र तोंपर्यंत सत्त्वगुणी व्यक्तींनी धीर न सोडतां प्रयत्नांची पराकाष्ठा करीत राहिलें पाहिजे. म्हणजे 'प्रयत्नांतीं परमेश्वर' या न्यायानें परमेश्वर कोणत्या ना कोणत्या रूपानें त्यांच्या साह्याला धावून येतो.

देवी महात्म्यांतील देवीचेंही सांगणें आहे कीं "**इत्थं यदा यदा बाधा दानवोत्था भविष्यति। तदा तदाऽवतीर्याहं करिष्याम्यरिसंक्षयम्**" म्हणजे "ज्या ज्या वेळीं दानवांकडून पृथ्वीवरच्या सात्विक वृत्तीच्या-सुसंस्कृत लोकांना पीडा होईल त्या त्या वेळीं मी अवतार घेऊन त्या शत्रूंचा निःपात करीन."

आज आपण ज्या आपत्तींत सांपडलों आहों त्या आपत्तींत मनोभावनेनें तिची प्रार्थना करूं या कीं :—

**"हे देवि, ये. तूं या पृथ्वीवर पुनः अवतार घेऊन ये आणि मानवताच नष्ट करूं पाहाणाऱ्या दानवांचा संहार कर !"**

# शारदीय नवरात्र

## भाग दुसरा

## ( पूजाविधि )

****************************************************

### १ पारंपरिक सामान्य कुलाचार

पहिल्या भागांत वर्णिलेल्या श्रीमहाकाली—महालक्ष्मी—महासरस्वती या त्रिशक्तींबरोबरच श्रीदुर्गा अथवा श्रीनवदुर्गा या देवीचीही या शक्तिदेवींसमवेतच पूजा करण्याची प्रथा अनेक कुटुंबांत आहे. श्रीदुर्गा अथवा श्रीनवदुर्गा * ही अनेक कुटुंबांची कुलदेवताही असते.

या देवतांच्या पूजाविधींत कुलाचारांना प्राधान्य असतें. त्यामुळें विधिनियमांत थोडाबहुत फरक असतो. तथापि सर्व-सामान्य विधि-नियम पुढीलप्रमाणें असतात :—

अश्विन शु॥ १ ला ※ देवघरांत-घरांतील अत्यंत शुचिर्भूत अशा जागीं घटस्थापना करावयाची. ही घटस्थापना म्हणजे एका तांब्याच्या कलशावर

---

* श्रीनवदुर्गा हें नांव पडण्याचें कारण श्रीदुर्गेनें प्रसंगोपात्त नऊ अवतार घेतले हें होय. या नऊ अवतारांची नांवें पुढीलप्रमाणें आहेत:—

( १ ) शैलपुत्री ( २ ) ब्रह्मचारिणी ( ३ ) चन्द्रघण्टा ( ४ ) कूष्मांडा ( ५ ) स्कंदमाता ( ६ ) कात्यायनी ( ७ ) कालरात्री ( ८ ) महागौरी आणि ( ९ ) सिद्धिदात्री.

※ ही घटस्थापना प्रतिपदेला करावयाची असली तरी एकाद्या वर्षी ही प्रतिपदा दोन दिवस असते. त्यावेळीं कोणता दिवस घ्यावा असा प्रश्न

किंवा मातीच्या 'घटा'वर पूर्णपात्र ठेवून त्यांत मंडलाकार मुख्य देवता श्रीमहाकाली—महालक्ष्मी—महासरस्वती व त्यांच्या अनेक परिवार देवता यांची स्थापना करणें. घटाशेजारीं नवें धान्य रुजत घालतात व हें रुजवण उत्सवसमाप्तीनंतर प्रसाद म्हणून शिरीं धारण करतात.

देवतास्थापनेच्या वेळीं नंददीप-अखंडदीप-नित्यमाला-सप्तशतीपाठ-देवी-भागवतश्रवण-नित्य अथवा पहिल्या व शेवटच्या दिवशीं ब्राह्मण-कुमारी-सुवासिनीपूजन व भोजन इत्यादि जीं पूजेचीं अंगें नऊ दिवसपर्यंत आचरावयाचीं असतील त्यांचा संकल्पपूर्वक उच्चार करतात आणि पुढें दर दिवशीं शुचिर्भूत होऊन या पीठस्थ देवतांची पूजा केली जाते. आणि शेवटच्या दिवशीं होम-हवन-बलिदान इत्यादि तांत्रिक विधि * केले जातात.

---

पडतो. त्याचा शास्त्रार्थ असा आहे कीं, "ही प्रतिपदा सामान्यतः सूर्योदयीं असली पाहिजे. म्हणून ती अमावास्यायुक्त असेल तर दुसऱ्या दिवशींची घ्यावी. प्रतिपदेचा क्षयच असेल तर मात्र अमावास्यायुक्त असली तरी तीच घ्यावी आणि वृद्धि असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी.

* हें तांत्रिक विधि व अनुष्ठानें मूळ हिंदुधर्मीयांतील तंत्रमार्गीयांनीं बसविलेलीं आहेत. विशिष्ट देवताविषयक आराधनांवरून हिंदु समाजांत जे अनेक पंथ उत्पन्न झाले, त्यांत शक्तिदेवीच्या आराधकांना 'शाक्त' असें म्हणूं लागले. या पंथांत पुरुष—देवतांना 'भैरव' व स्त्री—देवतांना 'शक्ति' अशीं नांवें आहेत. शिव हा "महाभैरव' असें मानतात आणि 'शक्ति' ही शिवाची पत्नी पार्वती हिचें प्रासंगिक स्वरूप असें मानलें जातें.

या 'शाक्तां'त पुनः 'दक्षिणमार्गी' नि 'वाममार्गी' असे भेद असून दक्षिणमार्गी हे सात्त्विक व वाममार्गी हे तामसी गणले जातात. त्यांचीं अनुष्ठानें उग्र असतात.

नऊ दिवस पूजा झाल्यावर दहाव्या दिवशीं या पीठस्थ देवतांची उत्तरपूजा करून त्यांचें विसर्जन करण्यांत येतें.

या नऊ दिवसांत कुटुंबांतील कर्त्या पुरुषाकडून उपोषण, नक्त, एकभुक्तव्रत इत्यादि नियमही अनेक ठिकाणीं पाळण्यांत येतात. ×× तसेंच या नऊ दिवसांत चुलीवर तवा ठेवायचा नाहीं म्हणजे भाकरी किंवा पोळी भाजावयाची नाहीं असा नियम कित्येक कुटुंबांत पाळला जातो.

'उदयोऽस्तु' हा या देवीच्या नांवाचा गजर असतो.

या देवता जात्याच उग्र व तामसी स्वरूपाच्या असल्यामुळें त्यांच्या उपासनेंत तमोगुणविशिष्ट असा रक्तानें माखलेला बलि आणि मांस व मद्य यांचा नैवेद्य विहित मानलेला आहे. बंगालसारख्या शक्तिप्रधान प्रांतांत

---

हिंदुधर्मांतील हा तंत्रमार्ग म्हणजे दैवताराधनेच्या वेळीं न्यास, मुद्रा, बीजमंत्र, कवचें इत्यादि विधि. हे या वामगार्यांनींच निमाण कलले असून कालांतरानें त्यांचा वैदिक कर्माचरणांतही शिरकाव झाला असें अनेक संशोधकांचें मत आहे.

×× या नवरात्रांत मधले कांहीं दिवस विशिष्ट व्रतांचें वा आराधनांचे असतात. उदा०—शु०॥ ५ उपांगललिता देवीचें व्रत. तसेंच मूळ नक्षत्रीं श्रीसरस्वतीचें आवाहन, पूर्वाषाढा नक्षत्रीं बलिदान, आणि श्रवण-नक्षत्रीं विसर्जन करतात.

शु०॥ ८ श्रीमहालक्ष्मी—उत्सव. हा मुख्यतः चित्तपावन ब्राह्मणांतील स्त्रियांचा उत्सव आहे.

शु०॥ ९ हिला खांडेनवमी म्हणतात. या दिवशीं शस्त्रपूजा करण्याची चाल अनेक कुटुंबांत असते.

शु०॥ १० हा नवरात्र—विसर्जनाचा दिवस होय. याच दिवशीं शमीपूजन, सरस्वतीपूजन इत्यादि करतात.

कालीदेवीच्या मंदिरांतून या नवरात्रांत अजापुत्रांचीं मुंडकीं निं रक्ताचे पाट वाहतांना दिसतात ते यामुळेंच.

महाराष्ट्रांतही हा प्रघात एका काळीं चालू असला पाहिजे. पण जैन धर्माच्या (किंवा मताच्या) प्रसाराच्या वेळीं त्याला पुष्कळच आळा पडला आणि बलिदानासाठीं जिवंत पशु मारण्याच्या ऐवजीं कोहळा हें त्याचें प्रतीक मानण्यांत येऊन हवनासाठीं या फळाची योजना करण्यांत आली.

ब्राह्मणांच्या घरीं आणि ज्या ठिकाणीं ब्राह्मणद्वारा ही पूजा केली जाते तिथें तर कोहळ्याचाच बलि देण्याचा प्रघात आज शेंकडो वर्षें रूढ आहे.

## २ प्राथमिक सूचना

इतर देवतांच्या पूजांच्या वेळेप्रमाणेंच स्नान, धूत कार्पासवस्त्र अगर लोकरीचें वा रेशमी वस्त्र नेसणें, गोमयानें सारविलेल्या व रांगोळी घातलेल्या शुद्ध पवित्र जागीं आसनासाठीं पाट; त्यावर शक्य असल्यास मृगाजिन, व्याघ्राजिन, दर्भासन, इत्यादिकांचें आच्छादन, समोर तांब्या-भांडें, ताम्हन, बाजूला तेलवात घातलेली समई व इतर पूजासाहित्य ठेवून शुद्ध-भक्तियुक्त अंतःकरणानें ही पूजा करावी. समोरील देवतास्थापनेची जागाही शुद्ध-पवित्र-यथाशक्ति शृंगारलेली असावी. आणि अशी सगळी व्यवस्था प्रथमच करून पुढें दिल्याप्रमाणें आचमनादि कार्यांनीं पूजेला आरंभ करावा.

**आचमन :** [पोटांत पाणी घेणें. उजव्या हाताच्या आंगठ्याजवळील बोट मिटून आंगठ्याच्या मुळावर टेकावें; म्हणजे तळहाताची गोकर्णाकृति होईल. तळहाताच्या या पोकळींत डाव्या हातांतल्या पळीनें पळीभर पाणी घेऊन तें पोटांत घेतलें म्हणजे एक आचमन होतें.

पुढें दिलेल्या श्रीविष्णुच्या चौवीस नांवांपैकीं पहिलीं तीन नांवें क्रमानें उच्चारून एकेक आचमन करावें व पुढील नांवें नुसतींच उच्चारावींत.]

ॐ केशवाय नमः । ॐ नारायणाय नमः । ॐ माधवाय नमः ।
ॐ गोविंदाय नमः । ॐ विष्णवे नमः । ॐ मधुसूदनाय नमः ।
ॐ त्रिविक्रमाय नमः । ॐ वामनाय नमः । ॐ श्रीधराय नमः ।
ॐ हृषीकेषाय नमः । ॐ पद्मनाभाय नमः । ॐ दामोदराय नमः ।
ॐ संकर्षणाय नमः । ॐ वासुदेवाय नमः । ॐ प्रद्युम्नाय नमः ।
ॐ अनिरुद्धाय नमः । ॐ पुरुषोत्तमाय नमः । ॐ अधोक्षजाय नमः ।
ॐ नारसिंहाय नमः । ॐ अच्युताय नमः । ॐ जनार्दनाय नमः ।
ॐ उपेंद्राय नमः । ॐ हरये नमः । ॐ श्रीकृष्णाय नमः ।

**प्राणायाम :** (प्राणवायु कोंडणें. प्रथम उजव्या हाताच्या आंगठ्यानें उजवी नाकपुडी दाबून डाव्या नाकपुडीनें श्वास आंत घेणें. मग सर्व बोटांनीं दोन्ही नाकपुड्या दाबून श्वास स्थिर करणें. आणि नंतर उजव्या नाकपुडीवरील आंगठा काढून श्वास बाहेर सोडणें. या कृतीला प्राणायाम म्हणतात. तो करतांना पुढील मंत्र म्हणावा— )

ॐ प्रणवस्य परब्रह्म ऋषिः । परमात्मा देवता ।
दैवी गायत्री छंदः । गायत्र्या गाथिनो विश्वमित्र ऋषिः ।
सविता देवता । गायत्री छंदः । प्राणायामे विनियोगः ।

ॐ भूः ॐ भुवः ॐ स्वः ॐ महः ॐ जनः ॐ तपः ॐ सत्यम् ॥

( हे अंतरिक्षांतील सात लोक आहेत. त्यांचा उच्चार-स्मरण करतांना उजव्या हाताच्या करांगुळीपासूनची क्रमानें पांच बोटें मिटून नंतर करांगुळी व अनामिका उघडावी. म्हणजे सात संख्या पुरी होईल. नंतर पुढील मंत्र म्हणावा— )

ॐ भूर्भुवःस्वः ॥ ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ॥
धियो यो नः प्रचोदयात् ॥ ॐ आपोज्योती रसोमृतं ब्रह्म भूर्भुवः
स्वरोम् ॥

( याला गायीत्रीमंत्र म्हणतात. हा सूर्यस्तुतिपर आहे. " आम्हीं त्या तेजस्वी सूर्याचें ध्यान करितों; तो आमच्या बुद्धीला प्रेरणा करो. " असा या मंत्राचा अर्थ आहे. )

**देवादिकांना वंदन :**

**श्रीमन्महागणाधिपतये नमः। श्री सरस्वत्यै नमः। श्री गुरुभ्यौ नमः। वेदाय नमः। वेदपुरुषाय नमः। इष्टदेवताभ्यो नमः। कुलदेवताभ्यो नमः। स्थानदेवताभ्यो नमः। ग्रामदेवताभ्यो नमः। वास्तुदेवताभ्यो नमः। शचीपुरंदराभ्यां नमः। उमामहेश्वराभ्यां नमः। श्री लक्ष्मीनारायणाभ्यां नमः। कालकामपरशुरामेभ्यो नमः। मातापितृभ्यां नमः। आदित्यादि नवग्रहदेवताभ्यो नमः। सर्वेभ्यो देवेभ्यो नमः। सर्वेभ्यो ब्राह्मणेभ्यो नमः। उपस्थितसर्वलोकेभ्यो नमः। एतत्कर्मप्रधानदेवताभ्यो नमः। ॥अविघ्नमस्तु॥**

**श्रीगणपत्यादिकांची प्रार्थना :**

**वक्रतुंड महाकाय कोटिसूर्यसमप्रभ।**
**निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥ १ ॥**
**या कुंदेंदुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रावृता।**
**या वीणावरदण्डमंडितकरा या श्वेतपद्मासना ॥**
**या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैः सदा वंदिता।**
**सा मां पातु सरस्वती भगवती निःशेषजाड्या पहा ॥ २ ॥**
**गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः।**
**गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ३ ॥**
**सर्वदा सर्वकार्येषु नास्तितेषाममंगलम्।**
**येषां हृदिस्थो भगवान् मंगलायतनं हरिः ॥ ४ ॥**

तदेव लग्नं सुदिनं तदेव ।
ताराबलं चंद्रबलं तदेव ॥
विद्याबलं दैवबलं तदेव ।
लक्ष्मीपते तेऽङ्घ्रियुगं स्मरामि ॥ ५ ॥
सर्वेष्वारब्धकार्येषु त्रयस्त्रिभुवनेश्वराः ।
देवा दिशन्तु नः सिद्धिं ब्रह्मेशानजनार्दनाः ॥ ६ ॥

[आपण आरंभिलेलें हें पूजाकर्म निर्विघ्नपणें तडीस जावें म्हणून श्री गणपति-सरस्वती-ब्रह्मा-विष्णु-महेश-गुरुदेव इत्यादींना ही प्रार्थना आहे.]

**देशकालादींचा उच्चार :**

**श्रीमद्भगवतो महापुरुषस्य । विष्णोराज्ञयाप्रवर्तमानस्य । अद्यब्रह्मणः द्वितीये परार्धे । विष्णुपदे ॥ श्रीवाराहकल्पे । वैवस्वत मन्वन्तरे । भरतवर्षे । भरतखंडे । जंबुद्वीपे । इषुपाद्रामक्षेत्रे । गोदावर्याः दक्षिणे तीरे । ( उत्तरे तीरे इ. ) कलियुगे । कलिप्रथमचरणे । अष्टाविंशतितमे युगे । बौद्धावतारे । शालिवाहन शके ।........ नाम+संवत्सरे । दक्षिणायने । शरदृतौ । आश्विनेमासे । शुक्लपक्षे । ....तिथौ+ .... वासरे+ अद्य .... दिवसनक्षत्रे+ । विष्णुयोगे ।**

---

+ तिथि, वार, नक्षत्र, योग आणि करण हीं पांच अंगें मिळून पंचांग होतें. हीं पांचही अंगें पंचांगांत दिलेलीं असतात. तीं पाहून त्यांचा उच्चार इथें करावा. संवत्सराचें नांवही पंचांगांत दिलेलें असतेंच योग आणि करण हीं तादृश महत्त्वाचीं नसल्यामुळें त्यांना 'विष्णु' हें नांव इथें दिलें आहे. चंद्र-सूर्य आणि गुरु यांची राशीही पंचांगांत दिलेली असते ती पहावी.

[मी भरतखंडांत अमुक ठिकाणीं, अमुक दिवशीं, अमुक ग्रह अमुक स्थानीं असतां ही पूजा करीत आहे, असा या निवेदनाचा भावार्थ आहे. एवढें लांबलचक निवेदन न करतां "तिथिर्विष्णुस्तथावारो नक्षत्रं विष्णुरेवच योगश्च करणं चैव सर्वं विष्णुमयं जगत अद्यपूर्वोचरित वर्तमान एवंगुणविशेषण विशिष्टायांशुभपुण्यतिथौ"

विष्णुकरणे।....स्थिते वर्तमाने चंद्रे। ....स्थिते श्रीसूर्ये....स्थिते देवगुरौ शेषेषु ग्रहेषु यथायथा राशिस्थिषु सत्सु। एवंगुणविशेषण विशिष्टायां शुभपुण्यतिथौ।

संकल्प :– मम आत्मनः श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्राप्त्यर्थं। अस्माकं सर्वेषां सहकुटुंबानां क्षेम स्थैर्य विजय अभय आयुरारोग्य ऐश्वर्याभिवृद्ध्यर्थं द्विपद चतुष्पदानां शांत्यर्थं पुष्ट्यर्थं तुष्ट्यर्थं। समस्त मंगलावाप्त्यर्थं। समस्त दुरितोपशांत्यर्थं। समस्ताभ्युदयार्थंच इष्टकामसंसिद्ध्यर्थं। कल्पोक्तफलावाप्त्यर्थं।........ मम सकुटुंबस्य त्रिगुणात्मका श्रीदुर्गाप्रीतिद्वारा सर्वापच्छांतिपूर्वक दीर्घायुर्धनपुत्रादिवृद्धि – शत्रुपराजय – कीर्तिलाभप्रमुख चतुर्विध पुरुषार्थ सिद्ध्यर्थं अद्यारभ्य नवमीपर्यंतं महाकाली–महालक्ष्मी–महासरस्वती–नवदुर्गा प्रीत्यर्थं मालाबंधनं अखंड दीपप्रज्वालन-पूर्वकं (कुलाचार×असेल त्याप्रमाणें) बलिदान–चंडिकास्तोत्र-पाठ–तन्मंत्रजप–ब्राह्मणकुमारीपूजन – उपवास– नक्तैकभुक्ता-

(हें सर्व जग विष्णुमयच आहे; तेव्हां तिथि वार–नक्षत्रादि कालभेदही विष्णुमयच असल्यामुळें आजच्या शुभ दिवशीं मी ही पूजा करीत आहे.) एवढा निर्देश करूनही काम भागवितां येतें.]

× या कुलाचारासंबंधानें शिष्टांनीं असा एक नियम सांगून ठेवला आहे कीं कुलाचार हा जसा पूर्वीपासून चालत आला असेल तसा चालवावा. एखाद्या घराण्यांत दैववशात् एखाद्या पिढीला चांगले दिवस आले तरी त्यांनीं त्यांत अधिक भर घालण्याचा हव्यास धरूं नये. कारण कोणी सांगावें? सर्व दिवस सारखे नसतात. तेव्हां प्रथम वाढ करून मागाहून घट करण्याची पाळी येण्यापेक्षां वाढ न केलेलीच चांगली! वैयक्तिक आराधना किंवा आचार यांना अर्थातच हा नियम लागू नाहीं.

**न्यतमानियमादिरूपं शारद–नवरात्रपूजां करिष्ये । तदंगत्वेन प्रतिपदि विहितं कलशस्थापनादि करिष्ये ।**

( असें म्हणून उजव्या हातांत पाणी घेऊन ताम्हनांत सोडावें. )

नंददीपांतील ※ वात ९६ अंगुळें लांब सुताची पिळवटून केलेली असावी, आणि एकदा पेटविलेला दिवा वात खुंटूं नये, तेल तुटूं नये, आणि दिवा विझूं नये अशी खबरदारी घेऊन नऊ दिवस अखंड तेवत ठेवावी असें सांगितलें आहे.

[ माझें व माझ्या कुटुंबाचें सर्व प्रकारें कल्याण व्हावें, धनधान्यादि समृद्धि असावी, शत्रूचा पराजय व्हावा, चतुर्विध पुरुषार्थ मिळावे, दीर्घ आयुष्य प्राप्त व्हावें, सर्व आपत्ति दूर व्हाव्या इत्यादि लाभांसाठीं मी आजपासून नवमीपर्यंत श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गा यांची पूजा करण्याचा संकल्प करीत आहे. यांत मालाबंधन म्हणजे माळ बांधणें, अखंड दीप, चंडिकास्तोत्रपाठ, जप-उपवास इत्यादि कुलाचारांनीं मी ही पूजा करणार आहे. त्यासाठीं प्रथम आज प्रतिपदेला मी कलशस्थापनादि कृत्यें करतों. असा या संकल्पाचा एकंदर भावार्थ आहे. ]

**तथाच (किंवा तदंगत्वेन) आसनादि कलश-शंख-घंटा-पूजनं-दीपपूजनं च करिष्ये । शरीरशुद्ध्यर्थं ( श्रीपुरुषसूक्तेन ) षडंगन्यासंच करिष्ये । आदौ निर्विघ्नतासिद्ध्यर्थं श्रीमहागणपतिपूजनं ( किंवा स्मरणं ) च करिष्ये ।**

( असें म्हणून पूर्वीप्रमाणेंच पाणी सोडावें. )

[ वर सांगितल्या संकल्पाप्रमाणेंच या पूजेला आरंभ करण्यापूर्वींच्या कलश-शंख-घंटा-मंडपइत्यादींच्या पूजेचा, शरीरशुद्धि करावयाच्या न्यासाचा,

---

※ हा शब्द मूळचा 'आनंददीप' असा आहे. 'नंदादीप' शब्द अशुद्ध आहे. पण शिष्टांनीं रूढ केल्यामुळें त्याचें अशुद्धत्व कोणाच्या लक्षांत येत नाहीं.

व कोणतेंही कार्य निर्विघ्नपणें तडीस जावें म्हणून प्रारंभीं करावयाच्या श्रीगणपतिपूजन (किंवा स्मरण) करण्याचा हा संकल्प आहे. त्याप्रमाणें प्रथम या सगळ्या पूजा थोडक्यांत आटोपून नंतर मुख्य पूजेला सुरुवात करावयाची असते. ]

## श्रीमहागणपति–पूजन किंवा स्मरण

[ तांदूळ किंवा गहूं यांच्या छोट्याशा राशीवर एक नारळ किंवा सुपारी ठेवून श्रीगणपतीची स्थापना–गणपतीचें प्रतीक म्हणून- करावयाची व त्याची ध्यान-आवाहन इत्यादि सोळा उपचारांनीं किंवा निदान गंध-पुष्प-धूप-दीप-नैवेद्य या पंचोपचारांनीं पूजा करावयाची किंवा तेवढेंही नच जमलें तर **'सकलपूजार्थे गंधाक्षतपुष्पं समर्पयामि'** असें म्हणून त्या गणपतिप्रतीकाला गंध-अक्षता व फुलें वाहून नमस्कार करावयाचा अशी ही श्रीगणपतीची प्रारंभिक पूजा आहे. ]

**"गणनां त्वा शौनको गृत्समदो गणपतिर्जगती । गणपत्यावाहने विनियोगः । ॐ गणानांत्वा गणपतिं हवामहे । कविं कवीनामुपमश्रवस्तमम् । ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आनः । शृण्वन् नूतिभिः सीदसादनं" ***

[ देवादि गणांतील प्रमुख, बुद्धिमानांतला बुद्धिमान, कीर्तिसंपन्नांतला अग्रणी आणि साऱ्या स्तुतींचा पूज्य अधिपति अशा देवतेला इथें मी बोलावतों. असा या मंत्राचा भावार्थ आहे. ]

### श्रीमन्महागणपतयेनमोनमः

[ महागणपतीला आमचे अनेकानेक नमस्कार ]

"श्रीमहागणपतयेनमः आवाहनं समर्पयामि" किंवा "आवाहनार्थे अक्षतां समर्पयामि" असें म्हणून या गणपति-प्रतीकावर अक्षता वहाव्या.

---

* हा वैदिक स्वरयुक्त मंत्र आहे तसाच तो पुराणोक्त श्लोकही आहे.

व त्यानंतर पुढें आसन-पाद्य-अर्घ्य इत्यादि उपचार अर्पण करावे. शेवटीं तांबूल म्हणजे विडा (हा खाण्याच्या दोन किंवा पांच पानांवर एक सुपारी ठेवून तयार करतात) आणि दक्षणाही अर्पण करावी. पूजा पूर्ण झाल्यावर "**कार्यं मे सिद्धिमायातु प्रसन्ने त्वयि धातरि । विघ्नानि नाशमायान्तु सर्वाणि सुरनायक**" असें म्हणून या विघ्नहर्त्या गणपतीची प्रार्थना करावी.

या षोडशोपचार अगर पंचोपचार पूजेऐवजीं "श्रीमहागणपतिस्मरण" करूनही कार्याला सुरुवात करतां येते. त्यासाठीं वरील मंत्रांतील 'गणपत्यावाहने विनियोगः'च्या ऐवजीं 'गणपतिस्मरणे विनियोगः' असें म्हणून त्यापुढील मंत्र म्हणावा. किंवा त्याहीपेक्षां सोपा असा "**वक्रतुंड महाकाय कोटिसूर्यसमप्रभ । निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥ १ ॥**" हा मंत्र म्हणून "**श्रीमहागणपतये नमोनमः**" असें म्हणून हात जोडावे.

## आसन व वातावरणशुद्धि

(आपण ज्या आसनावर बसलेले असतों तें आसन व सभोंवतालचें वातावरण शुद्ध व्हावें म्हणून पुढील मंत्र म्हणावेः—)

**ॐ पृथ्वि त्वया धृता लोका देवि त्वं विष्णुना धृता । त्वं च धारय मां देवि पवित्रं कुरुचासनं ॥ १ ॥ अपक्रामन्तु भूतानि पिशाचाः सर्वतो दिशम् । सर्वेषामविरोधेन पूजाकर्म समारभे ॥ २ ॥ अपसर्पंतु ते भूता ये भूता भूमिसंस्थिताः । ये भूता विघ्नकर्तारस्तेनश्यन्तु शिवाज्ञया ॥ ३ ॥**

## षडंग न्यासः

(न्यास म्हणजे शरीराच्या अवयवांत निरनिराळ्या देवतांची भावना करून सर्व शरीराला स्पर्श करणें. त्याचे मंत्र असेः—)

*

ॐ यत्पुरुषं व्यदधुः कतिधाव्यकल्पयन् मुखं किमस्य कौ बाहूका ऊरूपादा उच्येते हृदयायनमः ।

( असें म्हणून हृदयाला हात लावावा. )

ॐ ब्राह्मणोस्य मुखमासीत् बाहूराजन्यःकृतः ।

ऊरूतदस्य यद् वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत । शिरसेस्वाहा ।

( असें म्हणून डोक्याला स्पर्श करावा. )

ॐ चंद्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्यो अजायत ।

मुखादिंद्रश्चाग्निश्च प्राणाद्वायुरजायत । शिखायैवषट् ।

( असें म्हणून शेंडीला स्पर्श करावा. )

ॐ नाभ्या आसीदंतरिक्षं शीर्ष्णोद्यौः समवर्तत ।

पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात्तथा लोकाँअकल्पयन् ।

कवचाय हुं ।

( असें म्हणून दोन्ही हात हृदयाच्या खालच्या बाजूकडे वळवावे. )

ॐ सप्तास्यासन् परिधयस्त्रिसप्त समिधः कृताः ।

देवायज्ञज्ञंतन्वाना अबध्नन् पुरुषं पशुं नेत्रत्रयाय वौषट्

( असें म्हणून डोळ्यांना स्पर्श करावा. )

ॐ यज्ञेन यज्ञेमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् । तेहनाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वेसाध्याःसन्तिदेवाः अस्त्रायफट् ।

( असें म्हणून टाळी वाजवावी व 'इतिदिग्‌दिबंधः' असें म्हणावें. )

कलशपूजा

कलशस्य मुखे विष्णुः कंठे रुद्रः समाश्रितः ।

मूले तत्रस्थितो ब्रह्मा मध्ये मातृगणाः स्मृताः ॥ १ ॥

कुक्षौतु सागराः सर्वे सप्तद्वीपा वसुंधरा । ऋग्वेदोथ यजुर्वेद सामवेदो ह्यथर्वणः । अंगैश्चसहिताः सर्वे कलशंतु समाश्रिताः । अत्र गायत्री सावित्री शंतिःपुष्टिकरी तथा । आयांतु देवपूजार्थं दुरितक्षय-कारकाः ।। गंगेच यमुने चैव गोदावरी सरस्वती । नर्मदे सिंधु कावेरी जलेऽस्मिन् सन्निधिं कुरु ।।

श्रीवरुणाय नमः सर्वोपचारार्थे गंधाक्षतपुष्पाणि समर्पयामि ।।

(असें म्हणून शुद्ध पाण्यानें भरलेला कलशाला—ज्यांतील पाण्याचा उपयोग आचमनासाठीं वगैरे केलेला असतो—त्याला गंध, अक्षता नि फुले वहावीं.)

## शंखपूजा

शंखादौ चंद्रदैवत्यं कुक्षौ वरुणदेवता ।
पृष्ठे प्रजापतिश्चैव अग्रे गंगासरस्वती ।।
त्वंपुरा सागरोत्पन्नो विष्णुना विधृतः करे ।
अग्रतः सर्वदेवानां पांचजन्य नमोऽस्तुते ।।

शंखदेवतायै नमः सर्वोपचारार्थे गंध-पुष्प-तुलसीपत्रं समर्पयामि ।। (असें म्हणून गंध फुलें व तुलसी शंखाला अर्पण करावीं. या शंखांत पूर्वीच पाणी भरलेलें असावें.)

## घंटापूजा

आगमार्थंतु देवानां गमनार्थंतु रक्षसां । कुरु घंटे रवंतत्र देवताव्हान लक्षणम् ।। घंटायै नमः सकलपूजार्थे गंधाक्षतपुष्पं समर्पयामि ।।

(असें म्हणून घंटेला गंधाक्षतपुष्पें वहावीं व घंटा वाजवावी.)

## दीपपूजा

भो दीप ब्रह्मरूपस्त्वं ज्योतिषां प्रभुव्ययः । अतस्त्वां स्थापयाम्यत्र मम शांतिप्रदो भव । दीपदेवतायै नमः सकलपूजार्थे गंधाक्षतपुष्पं समर्पयामि ।

( असें म्हणून समयीमध्यें लाविलेल्या दिव्याला गंध-अक्षता-फूल वाहून नमस्कार करावा. )

### मंडपपूजा

[ ज्या ठिकाणीं देवतास्थापन करावयाचें असतें ती जागा प्रथमच शुद्ध गोमयानें सारवून रांगोळी वगैरे घालून सुशोभित केलेली असते व तिच्यावर लहानशी मंडपी-आंब्याचे टाळ वगैरे बांधून तयार केलेली असते. निदान वरच्या बाजूला आंब्याचा टाळ तरी बांधलेला असतोच. अशा या शुभ मंडपीला देवतास्वरूप मानून तिची थोडक्यांत पूजा करावी ती अशी :— ]

**श्रीमंडपदेवतायै नमः गंधाक्षतपुष्पं समर्पयामि ।**

( असें म्हणून गंधाक्षतपुष्पें मंडपीवर घालावी. )

### प्रोक्षण

**अपवित्रः पवित्रोवा सर्वावस्थांगतोऽपिवा । यः स्मरेत् ॥ पुंडरीकाक्षं सबाह्याभ्यंतरः शुचिः ॥**

( असें म्हणून पूर्वी पूजा केलेल्या कलशांतील पाणी फुलानें किंवा तुळशीपत्रानें स्वतःच्या मस्तकावर व जमाविलेल्या पूजासाहित्यावरही शिंपडावें. )

## ३ घटस्थापना

[ आपल्या कुलदेवतेच्या किंवा नित्यपूजेच्या देवाच्या उजव्या बाजूस तांबड्या मातीची देवी करून त्यावर शुद्धोदकानें भरलेल्या व वारूळ गोठण इत्यादि पवित्र ठिकाणची माती आंत घातलेल्या कलशाची स्थापना करून त्यावर पूर्णपात्र ठेवून त्यांत श्रीदेवीची मूर्ति किंवा तदभावीं नारळ ठेवून पूजा वगैरे करणें याला घटस्थापना असें म्हणतात. ही पहिल्या दिवशीं करून पुढें नऊ दिवस तो घट तसाच ठेवावयाचा असतो. ]

## वेदांची प्रार्थना

( वेदीला हात लावून पुढील मंत्र म्हणावा:— )

ॐ महीद्यौः पृथ्विवीचन इमं यज्ञमिमिक्षितां ॥
पिपृतांनो भरीमभिः ॥

## कलशस्थापना

( वेदीच्या मध्यभागीं कलश ठेवून पुढील मंत्र म्हणावा:— )

ॐ आकलशेषु धावति पवित्रे परिषिच्यते ।
उक्थैर्यज्ञेषु वर्धते ॥

## कलशांत पाणी घालणें

( पुढील मंत्र म्हणून कलशांत पाणी घालावें:— )

ॐ इमं मे गंगे यमुने सरस्वति
शुतुद्रिस्तोमं सचता परुष्ण्या ।
असिक्न्यामरुद्वृधे वितस्तयार्जीकिये शृणुह्यासुषोमया ॥

## कलशांत गंध घालणें

( ह्या वेळी म्हणावयाचा मंत्रः— )

ॐ गंधद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिर्णीं ।
ईश्वरीं सर्वभूतानां तामिहोपव्हये श्रियम् ॥
हळद, आंबे हळद, नागरमोथा इत्यादि औषधि घालणें

( वरीलपैकीं शक्य तितक्या औषधि कलशांत घालून मंत्र म्हणावा तो— )

ॐ या औषधीः पूर्वाजाता देवेभ्य स्त्रियुगं पुरा ।
मनैनुबभ्रूणामहं शतं धामानि सप्तच ॥

## दुर्वा घालणें

( पुढील मंत्र म्हणून कलशांत दूर्वा घालाव्या:- )

ॐ कांडात् कांडात् प्ररोहंती परुषः परि ।
एवानो दूर्वे प्रतनु सहस्रेण शतेन च ॥

## पंचपल्लव किंवा आंब्याचीं पांच पानें असलेला टाळ ※ कलशावर ठेवणें

( पुढील मंत्र म्हणून हा पल्लव ठेवावा:- )

ॐ अश्वत्थेवो निषदन पर्णेवोवसतिष्कृता ।
गोभाजइत्किलासथ यत्सवनथ पुरूषं ।

## मृत्तिका ( माती ) कलशांत घालणें

( मृत्तिका पुढील मंत्रानें घालावी:- )

ॐ स्योना पृथिवी भवानृक्षरानिवेशवीः ।
यच्छानः शर्मसप्रथः ॥

## सुपाऱ्या [ दोन ] घालणें

( सुपाऱ्या पुढील मंत्रानें घालाव्या:- )

ॐ याः फलिनीर्या अफला अपुष्पायाश्च पुष्पिणीः ।
बृहस्पतिप्रसूता स्तानो मुंचंत्वं ह सः ॥

## पंचरत्नें किंवा तद्भावीं तांब्याचीं पांच * नाणीं घालणें

( हीं घालतांना पुढील मंत्र म्हणावा:— )

ॐ सहिरत्नानि दाशुषे सुवाति सविता भगः ।
तं भागं चित्रमीमहे ॥

---

※ अश्वत्थोदुम्बर प्लक्ष चूत न्यग्रोध पल्लवाः ।
पञ्चपल्लवमित्युक्तं सर्वकर्माणि शोभनम् ॥ १ ॥

* या पूजेंत ५ या संख्येला महत्त्व आहे. कलशांत सोनें, मोतीं, हिरा, प्रवाळ आणि पाच किंवा माणिक हीं पंचरत्नें घालावयाचीं. आंब्याचा टाळही पांच पानांचा असावयाचा.

## सोन्याचें व रुप्याचें नाणें घालणें

( सोन्याचें वा रुप्याचें एकादें नाणें घालतांना म्हणावयाचा मंत्रः— )

**ॐ हिरण्यरूपः सहिरण्य संहगपान्नपात्सेदुहिरण्यवर्णः ।**
**हिरण्ययात् परियोनेर्निषद्या हिरण्यदाददत्यन्नमस्मै ॥**

## गंध-फूल-अक्षता हळद-कुंकू आणि पंचामृत घालणें

( हे सर्व पदार्थ क्रमानें किंवा एकत्र घालतांना म्हणावयाचा मंत्रः— )

**ॐ युवा सुवासाः परिवीत आगात्**
**स उ श्रेयान् भवति जायमानः ।**
**तं धीरासः कवय उन्नयंति**
**स्वा ध्यो ३ मनसा देवयंतः ॥**

## पूर्णपात्र म्हणजे ताम्हनांत किंवा द्रोणांत तांदूळ भरून तें पात्र कलशावर ठेवणें

( हें पात्र ठेवतांना म्हणावयाचा मंत्रः— )

**ॐ पूर्णादर्विपरापत सुपूर्णानुररापत ।**
**वस्ने विक्रीणावहा इषमूर्जे शतक्रतो ॥**

याप्रमाणें कलशस्थापना झाल्यावर त्या कलशावर कुंकवानें अष्टदल काढावें. आणि "**श्रीवरुणाय नमः सकलपूजार्थे गंधाक्षत-पुष्पं समर्पयामि**" असें म्हणून त्या घटाला गंध-फूल-अक्षता वहाव्या.

यानंतर त्या पूर्णपात्रामध्यें देवीची किंवा आपल्या मुख्य कुलदेवाची मूर्ति ठेवावी. तसें शक्य नसल्यास त्या कलशावर नारळ ठेवावा; म्हणजे हें देवतास्थापन पूर्ण झालें.

## अंकुरारोपण

( घटस्थापना झाल्यावर त्या घटा-कलशाभोंवती बारीक तांबडी माती पसरावी आणि त्या मातींत नवधान्य-भात, गहूं, जोंधळे, मका, मूग, हरभरे

इत्यादि पेरावे आणि त्यावरं पुनः माती पसरावी. या वेळीं म्हणावयाचे मंत्रः—).

ॐ स्योना पृथिविभवानृक्षरानिवेशनी ।
यच्छानः शर्मसप्रथः ॥ १ ॥
ॐ येनतोकाय तनयाय धान्यं । बीजं वहध्वे आक्षितं ।
अस्मभ्यं तद्धत्तन यद्वईमहे राधो विश्वायु सौभागम् ॥ २ ॥
ॐ पर्जन्याय प्रगायत दिवस्पुत्राय मीळहुषे ।
स नोयवसमिच्छतु ॥ ३ ॥
ॐ वर्षतुते विभावरि दिवो अभ्रस्य विद्युतः ।
रोहंतु सर्व बीजान्यव ब्रह्मद्विषो जहि ॥ ४ ॥

( हे मंत्र म्हणून त्यावर पाणी शिंपडावें. अंकुर पिवळा येण्यासाठीं हळदीचें पाणी करून शिंपणें किंवा मूळ धान्यच हळदीच्या पाण्यांत थोडा वेळ भिजत घालून नंतर रुजत घालणें, हें इच्छेप्रमाणें करावें.)

## घटप्रार्थना

( धान्य रुजत घातल्यावर घटप्रार्थना करतांना म्हणावयाचे मंत्रः—)

देवदानवसंवादे मथ्यमाने महोदधौ ।
उत्पन्नो ऽसि तदा कुंभ विधृतो विष्णुना स्वयम् ॥
त्वत्तोये सर्व तीर्थानि देवाः सर्वे त्वयि स्थिताः ।
त्वयि तिष्ठन्ति भूतानि त्वयि प्राणाः प्रतिष्ठिताः ॥
शिवः स्वयं त्वमेवासि विष्णुस्त्वंच प्रजापतिः ।
आदित्या वसवो रुद्रा विश्वेदेवाः सपैतृकाः ॥
त्वयि तिष्ठन्ति सर्वेऽपि यतः कामफलप्रदाः ।
त्वत्प्रसादादिमं यज्ञं कर्तुमीहे जलोद्भव ।
सांनिध्यं कुरु मे देव प्रसन्नो भव सर्वदा ॥

आगच्छ वरदे देवि दैत्यदर्पनिषूदनि ।
पूजां गृहाण सुमुखि नमस्ते शंकरप्रिये ॥
सर्वतीर्थमयं वारि सर्वदेवसमन्वितम् ।
इमं घटं समागच्छ सांनिध्यमिह कल्पया ॥

## ४ अखंड नंद-दीप-स्थापना

( घटानजीक नऊ दिवसपर्यंत नंददीप अखंड तेवत ठेवणें हा या नवरात्रपूजेंतील एक महत्त्वाचा विधि आहे. हा दीप तुपाचा असेल तर घटाच्या उजवे बाजूस आणि तेलाचा असेल तर डाव्या बाजूस ठेवतात. ज्या ठिकाणीं हा दिवा ठेवावयाचा त्या स्थलाची पूजा करतांना म्हणावयाचा मंत्रः— )

### स्थलपूजा

ॐ ऐं. –ह्रीं. श्रीं. वास्तुपुरुषाय नमः
गंधाक्षत-पुष्पं समर्पयामि

( असें म्हणून त्या स्थलावर गंध-अक्षता व फुलें वहावीं. )

### दीपपूजा

( समई किंवा उच्चासनावर पणती वगैरे ठेवावयाची व तींत तेल किंवा तूप पूर्ण भरून काडींत गुंडाळलेली कापसाची वात—नऊ दिवस पुरेल इतकी लांब द्विगुणित वात—त्यांत घालावयाची व दिवा पेटवून पुढील मंत्र म्हणावयाचा :— )

ॐ ऐं. ह्रीं. श्रीदीपाय नमः
गंधाक्षत-पुष्पं समर्पयामि

( असें म्हणून त्या दीपावर गंध—अक्षता व फुलें वहावीं व पुढीलप्रमाणें प्रार्थना करावी :— )

अखंडदीपकं देव्याः प्रीतये नवरात्रकम् ।
उज्ज्वालये अहोरात्रमेकाचित्तो दृढव्रतः ॥
अस्मिन् क्षेत्रे दीपनाथ निर्विघ्नसिद्धिहेतवे ।
लक्ष्मीयंत्रस्य पूजार्थमनुज्ञां दातुमर्हसि ॥

## ५ महाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-स्थापना

( या तीन देवींची स्थापना कलशावरील पूर्णपात्रामध्यें अगर घटासमोरच मध्यभागीं तीन सुपाऱ्या ठेवून व त्यांवर तांबड्या अक्षता वाहून करतात. त्या वेळीं म्हणावयाचे मंत्र पुढीलप्रमाणें:— )

खड्गं चक्रगदेषुचापधरिधान् शूलं भुशुंडीं शिरः ।
शंखं संदधतीं करौ त्रिनयनां सर्वांगभूषावृताम् ॥
नीलाश्मद्युतिमास्य पाददशकां सेवे महाकालिकां ।
यामस्तौत्स्वपिते हरौ कमलजो हंतुं मधुं कैटभम् ॥ १ ॥
( महाकाल्यै नमः महाकालीं अवाहयामि-स्थापयामि । )
अश्वस्त्रक्परशू-गदेषु कुलिशं पद्मं धनुः कुंडिकां ।
दंडं शक्तिमसिं च चर्मजलजं घंटां सुराभाजनम् ॥
शूलं पाश-सुदर्शनेच दधतीं हस्तैः प्रवालप्रभां ।
सेवे सैरभमर्दिनीमिह महालक्ष्मीं सरोजस्थिताम् ॥ २ ॥
( श्रीमहालक्ष्मै नमः महालक्ष्मीं आवाहयामि-स्थापयामि ॥ )
घंटाशूल हलानि शंख मुसले चक्रं धनुः सायकं ।
हस्ताब्जैर्दधतीं घनांतविलसच्छीतांशुतुल्यप्रभां ॥
गौरीदेहसमुद्भवां त्रिजगतामाधारभूतां महां ।
पूर्वामत्र सरस्वतीमनुभजे शुंभादिदैत्यार्दिनीम् ॥ ३ ॥
(श्री महासरस्वत्यै नमः महासरस्वतीं आवाहयामि-स्थापयामि ॥)

# ६ नवदुर्गा-स्थापन

(नवदुर्गा ही देवता तिच्या नांवाप्रमाणें दुर्गादेवीच्या नऊ नांवांनीं संबोधिली जाते. तिची स्थापना करतांनाही कलशावरील पूर्णपात्रामध्यें अथवा कलशाखालीं सभोंवती नऊ सुपाऱ्या पूर्वेकडून क्रमानें एकेक ठेवून त्यावर तांबड्या अक्षता वहातात. त्यावेळीं म्हणावयाचे मंत्र क्रमानें:—)

जगत्पूज्ये जगद्वंद्ये सर्वशक्तिस्वरूपिणि ।
पूजां गृहाण कामारि जगन्मातर्नमोऽस्तुते ॥
("शैलपुत्र्यै नमः" शैलपुत्रीं आवाहयामि-स्थापयामि ॥१॥)
त्रिपुरां त्रिगुणाधारां मार्गज्ञानस्वरूपिणीं ।
त्रैलोक्यवंदितां देवीं त्रिमूर्तिं पूजयाम्यहम् ॥
("ब्रह्मचारिण्यै नमः" ब्रह्मचारिणीं आवाहयामि-स्थापयामि॥२॥)
कालिकांतु कलातीतां कल्याणहृदयां शिवां ।
कल्याणजननीं नित्यं कल्याणीं पूजयाम्यहम् ॥
"चंद्रघंटायै नमः" चंद्रघंटां आवाहयामि-स्थापयामि ॥३॥)
अणिमादिगुणोदारा मकाराचारचक्षुषां ।
अनंतशक्तिभेदांतां कामाक्षीं पूजयाम्यहम् ॥
("कूष्मांडायै नमः" कूष्मांडां आवाहयामि-स्थापयामि ॥४॥)
चंडवीरां चंडमायां चंडमुंडप्रभंजिनीम् ।
तां नमामि च देवेशीं चंडिकां पूजयाम्यहम् ॥
("स्कंदमात्रे नमः" स्कंदमातरं आवाहयामि-स्थापयामि॥५॥)
सुखानंदकरां शांतां सर्वदेवनमस्कृतां ।
सर्वभूतात्मिकां देवीं शांभवीं पूजयाम्यहम् ॥
('कात्यायन्यैनम' कात्यायनीम् आवाहयामि स्थापयामि॥६॥)

चंडवीरां चंडमायां चंडमुंडप्रभंजिनीम् ।
तां नमामि च देवेशीं गायत्रीं पूजयाम्यहम् ॥
("कालरात्र्यै नमः" कालरात्रीं आवाहयामि-स्थापयामि ॥७॥)
सुंदरीं स्वर्णवर्णांगीं सुखसौभाग्यदायिनीम् ।
संतोषजननीं देवीं सुभद्रां पूजयाम्यहम् ॥
("महागौर्यै नमः" महागौरीं आवाहयामि स्थापयामि ॥८॥)
दुर्गमे दुस्तरे कार्ये भयदुर्गविनाशिनीम् ।
पूजायमि सदा भक्त्या दुर्गां दुर्गतिंहारिणीम् ॥
("सिद्धिदायै नमः" सिद्धिदां आवाहयामि-स्थापयामि ॥९॥)

## ७ प्राणप्रतिष्ठा

(देवतास्थापन झाल्यावर या प्रतीकांत देवतासंचार व्हावा म्हणून पुढील मंत्र म्हणावा व तो म्हणतांना दृष्टि समोरील घटाकडे स्थिर असावी:-)

रक्तांभोधिस्थपोतोल्लसदरुणसरोजाधिरूढा कराब्जैः
पाशंकोदंडमिक्षूद्भवमथगुणमप्यंकुशं पंच बाणान् ॥
बिभ्राणासृक्कपालं त्रिनयनलसिता पीनवक्षोरुहाढ्या ।
देवी बालार्कवर्णा भवतु सुखकरी प्राणशक्तिः परा नः ॥१॥

(हा मंत्र म्हणून झाल्यावर 'ॐ' हें अक्षर-याला प्रणव म्हणतात-पंधरा वेळां उच्चारावें. हें उच्चारतांना उजवा हात आपल्या छातीकडे व नजर समोरच्या घटाकडे असावी.)

नंतर लगेच या संचारित देवतांना साखरेचा नैवेद्य दाखवावा.

## ८ षोडशोपचार-पूजा

(देवतास्थापन झाल्यावर या देवींचें ध्यान करून षोडशोपचार पूजा करावयाची ती पुढीलप्रमाणें:- )

( " अथ ध्यानम् " असें म्हणून पुढील मंत्र म्हणावा:— )

## ध्यान

विद्युद्दामसमप्रभां मृगपतिस्कंधस्थितां भीषणाम् ।
कन्याभिः करवालखेटविलसद्धस्ताभिरासेविताम् ॥
हस्तैश्चक्रदरालिखेटविशिखांश्चापं गुणं तर्जनीम् ।
बिभ्राणामनलात्मिकां शशिधरां दुर्गां त्रिनेत्रां भजे ॥ १ ॥

श्रीमहाकाली - महालक्ष्मी - महासरस्वती - नवदुर्गा देवताभ्यो नमः ध्यायामि

## आवाहन

( आवाहन पुढील मंत्रानें करावें:— )

ॐ हिरण्यवर्णां हरिणीं सुवर्णरजतस्रजां
चंद्रां हिरण्मयीं लक्ष्मीं जातवेदो मआवह + ॥
तप्तकांचन संकाशां मुक्ताभरणभूषिताम् ।
रत्नसिंहासनासीनां वन्दे देवीं महेश्वरीम् ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती नवदुर्गा देवताभ्यो नमः आवाहनं समर्पयामि (किंवा) आवाहयामि

## आसन

( आसन देण्याचा मंत्र पुढीलप्रमाणें:— )

ॐ तांमआवहजातवेदो लक्ष्मीमलपगामिनीं ।
यस्यां हिरण्यं विंदेयं गामश्वं पुरुषानहम् ॥
खड्गशूलगदाहस्तामभयं दधतीं करैः ।
गजारूढां महादेवीं सर्वैश्वर्यप्रदायिनीम् ॥

---

\+ सामान्य पूजांत पुरुषसूक्ताच्या १६ ऋचा आवाहनादि उपचारांसाठी योजतात; त्याप्रमाणें या पूजेंत श्रीसूक्ताच्या ऋचांचा उपयोग करतात.

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गा देवताभ्यो नमः
आसनं समर्पयामि (किंवा) आसनार्थे अक्षतां समर्पयामि

पाद्य

(पुढील मंत्रानें पाय धुण्यासाठीं पाणी द्यावें :—)

ॐ अश्वपूर्वां रथमध्यां हस्तिनादप्रबोधिनीम् ।
श्रियं देवीमुपव्हये श्रीर्मादेवीर्जुषतां ॥
विद्याधरीं महादेवीं पद्माभां लोकनायकाम् ।
सर्वैश्वर्यप्रदां देवीं महालक्ष्मीं प्रपूजये ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गा देवताभ्योनमः
पाद्यं समर्पयामि

अर्घ्य

(गंध—अक्षता—पुष्पमिश्रित पाणी हात धुण्यासाठीं देतांना म्हणावयाचा मंत्रः—)

ॐ कांसोस्मितां हिरण्यप्राकारामार्द्रां ज्वलंतीं तृप्तां तर्पयन्तीम् ।
पद्मेस्थितां पद्मवर्णां तामिहोपव्हये श्रियम् ॥
दधिदूर्वाक्षतायुक्तं गंगातोय समन्वितं ।
अर्घ्यं गृहाण भो देवि मया भक्त्या निवेदितम ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी महासरस्वती-नवदुर्गा देवताभ्यो नमः
अर्घ्यं समर्पयामि

आचमनीय

(पिण्यासाठीं किंवा चूळ भरण्यासाठीं शुद्ध पाणी देणें; या उपचारासाठीं पुढील मंत्र आहेः—)

ॐ चंद्रां प्रभासां यशसाज्वलंतीं श्रियं लोके देवजुष्टामुदारां ।
तां पद्मिनेमीं शरणमहं प्रपद्येऽ लक्ष्मीर्मेनश्यतां त्वावृणे ॥

नानारत्नप्रभां देवीं नानागणसमन्वितां ।
नारायणीं महालक्ष्मीं वन्दे तां विष्णुवल्लभाम् ॥
श्रीमहाकाली- महालक्ष्मी - महासरस्वती-नवदुर्गा देवताभ्यो नमः
आचमनीयं समर्पयामि

## स्नान

( स्नानासाठीं पाणी देणें; हा उपचार पुढील मंत्रानें अर्पण करावाः—)

ॐ आदित्यवर्णे तपसोधिजातो वनस्पतिस्तव वृक्षोऽथ बिल्वः ।
तस्यफलानि तपसानुदंतु मायां तरायाश्च बाह्या अलक्ष्मीः ॥
गंगा-सरस्वती-रेवा-पयोष्णी-नर्मदाजलैः ।
स्नापिताऽसि मया देवि तथाशांतिं कुरुष्व मे ॥
श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गा देवताभ्यो नमः
स्नानं समर्पयामि

## पंचामृतस्नान

(हा वरील स्नानान्तर्गतच उपचार आहे. दूध-दहीं-तूप साखर व मध हे पांच पदार्थ एकत्र करून ते स्नानासाठी देणें असा हा विधि असतो. त्यासाठीं पुढील मंत्र योजावाः— )

पयोदधिघृतंचैव शर्करामधुसंयुतं ।
पंचामृतं समानीतं त्वं गृहाण सुरेश्वरि ॥
श्रीमहाकाली - महालक्ष्मी - महासरस्वती - नवदुर्गा देवताभ्यो-
नमः पंचामृतस्नानं समर्पयामि

## गंधोदकस्नान

( हा उपचारही स्नानान्तर्गतच आहे. सुगंधी तेल, उष्णोदक स्नान, मांगलिक स्नान इत्यादि उपचारही यांतच येतात. गंधाचा उपयोग सुवासासाठींच असतो. हा उपचार पुढील मंत्रानें समर्पण करावाः—)

ॐ गंधद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टांकरीषिणीं ।
ईश्वरीं सर्व भूतानां तामिहोपव्हये श्रियं ॥
कर्पूरैलासमायुक्तं सुगंधिद्रव्यसंयुतं ।
गंधोदकं मयादत्तं स्नानार्थं प्रतिगृह्यताम् ॥
श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गा देवताभ्यो नमः
गंधोदकस्नानं समर्पयामि

## शुद्धोदकस्नान

( यानंतर स्वच्छ, शुद्ध पाणी वाहून हें स्नान पुरें करावयाचा मंत्रः-

ॐ आपोहिष्ठा मयोभुवस्तानऊर्जेदधातन । महेरणायचक्षसे ।
योवः शिवतमो रसस्तस्य भाजयते ह नः उशतीरिवमातरः ।
तस्मा अरंगमामवो यस्यक्षयाय जिन्वथ । आपो जनयथाच नः ॥
श्रीमहाकाली–महालक्ष्मी–महासरस्वती–नवदुर्गादेवताभ्यो नमः
शुद्धोदकस्नानं समर्पयामि

## स्नानोत्तर स्वल्पपूजा

( स्नान झाल्यावर करावयाची स्वल्पपूजा—यांत प्रथम आचमनासाठीं पाणी देऊन गंध—अक्षता—पुष्प—समर्पण करावयाचें व धूप-दीप दाखवून शेषपंचामृताचाच नैवेद्य दाखवावयाचा असतो. )

“श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गा देवताभ्यो नमः आचमनीयं समर्पयामि” (असें म्हणून ताम्हनांत पाणी सोडावें.)– “सकलपूजार्थे गंधाक्षतपुष्पाणि समर्पयामि” “धूपं समर्पयामि” “दीपंसमर्पयामि” नैवेद्यार्थे “पंचामृत शेष नैवेद्य समर्पयामि”
ॐ प्राणायस्वाहा । ॐ अपानायस्वाहा । ॐ व्यानायस्वाहा ।
ॐ उदानायस्वाहा । ॐ समानायस्वाहा । ॐ ब्रह्मणेस्वाहा ।
( असें म्हणून दोन्ही हात जोडून नमस्कार करावा. )

(इथें या पूजेचा अर्धा भाग पूर्ण होतो; म्हणून तदनुषंगिक पुढील प्रार्थना करावी :—)

**"अनेन पूर्वाराधनेन श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती नवदुर्गादेवताः प्रीयंताम् ॐ तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु । विष्णवे नमो । विष्णवे नमो ।। विष्णवे नमः ।।"**

## महाभिषेक स्नान

(महाभिषेक म्हणजे देवावर पाण्याची संतत धार धरून त्याची आराधना करणें. इथें घटस्थापना करून नऊ दिवसपर्यंत घट हालवावयाचा नसल्यामुळें हा अभिषेक फुलानें किंवा तुळशीपत्रानें घटावर सिंचन करून करतात. त्यासाठीं श्रीसूक्ताची एक आवृत्ति म्हणतात. विशेष आराधनेसाठीं रुद्रैकादशिनीप्रमाणें श्रीसूक्ताच्या १६ आवृत्ति व शेवटीं एकवार फलश्रुतिही म्हणण्याचा प्रघात आहे. हें श्रीसूक्त परिशिष्टांत दिलें आहे. त्याचप्रमाणें '॥ॐ सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्०' इत्यादि १६ ऋचांचें पुरुषसूक्त हें कोणत्याहि देवतेच्या अभिषेकाच्या वेळीं म्हणावयाचें एक सर्वसामान्य सूक्त आहे. विशिष्ट देवतांचीं सूक्तें म्हणून झाल्यावर शेवटीं हें सूक्त म्हणून अभिषेक संपवावयाचा असतो. जिज्ञासूंसाठीं आम्हीं हें सूक्तही परिशिष्टांत दिलें आहे:—)

## अभिषेकसमाप्ति

(ही पुढील मंत्रानें करावी.)

**ॐ देवस्यत्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्यामग्नेस्तेजसा सूर्यस्य वर्चसेन्द्रस्येंद्रियेणाभिषिञ्चामि । बलायश्रियै यशसेऽन्नाद्याय ॥**

**ॐ भूर्भुवस्वः अमृताभिषेकोऽस्तु । शांतिःपुष्टिस्तुष्टिश्चास्तु ।।**

**श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गा देवताभ्यो नमः**

*

**महाभिषेकस्नानं समर्पयामि । महाभिषेकस्नानांतरे आचमनीयं समर्पयामि ॥**

( असें म्हणून ताम्हनांत पाणी सोडावें, म्हणजे हें महाभिषेकस्नान पूर्ण झालें. )

## वस्त्र

( स्नानानंतर पुढचा उपचार वस्त्रसमर्पण हा होय. त्याचा मंत्र पुढीलप्रमाणें :— )

**ॐ उपैतुमां देवसखः कीर्किश्च मणिनासह ।**
**प्रादुर्भूतो सुराष्ट्रेऽस्मिन् कीर्तिमृद्धिं ददातु मे ॥**
**मुक्तामणि गणास्पर्श—स्फुरत् कंचुकमुत्तमं ।**
**पीतांबरं सोत्तरीयं गृहाण परमेश्वरि ॥**
**श्रीमहाकाली—महालक्ष्मी—महासरस्वती—नवदुर्गादेवताभ्यो नमः वस्त्रार्थे कार्पासवस्त्रे समर्पयामि**

(असें म्हणून दोन कापसाची वस्त्रें समर्पण करावीं. )

## उपवस्त्र

( उपवस्त्र—समर्पण करण्याचा मंत्र पुढीलप्रमाणें :— )

**ॐ क्षुत्पिपासामलाज्येष्ठामलक्ष्मीं नाशयाम्यहम् ।**
**अभूतिमसमृद्धिंच सर्वानिर्णुद मे गृहात् ॥**
**नानासिद्धिप्रदां देवीं नानागुणविवर्धिनीं ।**
**नानासूत्रधरां देवीं सर्वलोकमहेश्वरीं ॥**
**श्रीमहाकाली—महालक्ष्मी—महासरस्वती—नवदुर्गा देवताभ्यो नमः उपवस्त्रार्थे कार्पासवस्त्रे ( किंवा तदभावे ) अक्षतान् समर्पयामि**

# कंचुकी--कंठसूत्र--मंगलसूत्र

( कंचुकी म्हणजे चोळी व कंठसूत्र म्हणजे मंगलसूत्र—समर्पण हें वस्त्रांतर्गतच आहे. त्यासंबंधी मंत्र पुढीलप्रमाणें:— )

तप्तकांचनसंकाशां महालक्ष्मीं वरप्रदाम् ।
नानाभरणशोभाढ्यां वंदे त्वां वरदासनाम् ।।

श्रीमहाकाली—महालक्ष्मी—महासरस्वती—नवदुर्गादेवताभ्यो नमः कंचुकीं समर्पयामि ( किंवा तदभावे ) कंचुक्यार्थे अक्षतान् समर्पयामि

महागुणसमायुक्तं नानामणिसमन्वितम् ।
कंठसूत्रं मयानीतं गृहाण भक्तवत्सले ।।

किंवा

मांगल्यातंतुमणिभिर्मुक्ताफलविराजितम् ।
कंटस्य भूषणार्थाय प्रीत्यर्थं प्रतिगृह्यताम् ।।

श्रीमहाकाली-महालक्ष्मी- महासरस्वती—नवदुर्गादेवताभ्यो नमः कंठसूत्रं समर्पयामि ( हें कंठसूत्र समोरील कलशाला बांधलें तरी चालेल. )

## चंदन—सौभाग्यद्रव्य—समर्पण

( गंध—हळद—कुंकू—सिंदूर—कांकणें इत्यादि सौभाग्यद्रव्यें समर्पणाचे मंत्र पुढीलप्रमाणें:— )

ॐ गंधद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीम् ।
ईश्वरीं सर्वभूतानां तामिहोपव्हये श्रियम् ।।
चंदनागरुकर्पूर—कुंकुमारोचनैस्तथा ।
कस्तूर्यादि सुगंधंच सर्वांगेषु विलेपये ।।

श्रीमहाकाली–महालक्ष्मी । महासरस्वती–नवदुर्गादेवताभ्यो नमः विलेपनार्थे चंदनं समर्पयामि

उदितारुण संकाशं जपाकुसुमसंन्निभम् ।
सीमंतभूषणार्थाय सिंदूरं प्रतिगृह्यताम् ।

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गा देवताभ्यो नमः
सिंदूरं ( शेंदूर ) समर्पयामि

हरिद्रास्वर्णवर्णाभा सर्वसौभाग्यदायिनी ।
सर्वालंकारमुख्याहि देवि त्वं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गा देवताभ्यो नमः
हरिद्रां समर्पयामि

हरिद्राचूर्णसंयुक्तं कुंकुमं कामदायकन् ।
वस्त्रालंकरणं सर्वं देवि त्वं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्यो नमः
कुंकुमं समर्पयामि

काचस्यनिर्मितं दिव्यं कंकणंच सुरेश्वरि ।
हस्तालंकरणार्थाय कंकणं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्यो नमः
कंकणं समर्पयामि

कज्जलं कामिकं रम्यं कामिनीकामसंभवम् ।
नेत्रयोर्भूषणार्थाय कज्जले प्रतिगृह्यताम् ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्यो नमः
कज्जलं समर्पयामि

( हळद–कुंकू–काजळ–मंगळसूत्र आणि कांकणें हे सगळे स्त्रियांचे अलंकार आहेत. मानुषी स्त्रियांना ते प्रिय, भूषणभूत आणि मंगलकारक

आहेत. अर्थात् आपल्याप्रमाणेंच श्रीदेवतांनाही ते प्रिय असणारच या समजुतीनें हे अलंकार देवीला अर्पण करावयाचे असतात. यांचे वेगवेगळे मंत्र वर दिलेले आहेतच. पण ज्यांना हीं सगळीं द्रव्यें एकदमच अर्पण करावयाचीं असतील किंवा सर्व द्रव्यें उपलब्ध नसल्यामुळें त्यांतलीं थोडीच अर्पण करावयाची असतील अगर त्या सगळ्यांचें मनोमयच समर्पण करावयाचें असेल त्यांनीं "श्रीमहादेव्यैनमः सौभाग्यद्रव्यं समर्पयामि" किंवा "सकलालंकरणार्थे अक्षतां समर्पयामि" असें म्हणून असतील ती सर्व सौभाग्यद्रव्यें किंवा कांहींच नसतील तर तांबड्या अक्षता वाहून नमस्कार करावा. )

## पुष्प—फूलें

( पुष्प-फुलें-तुलसीपत्रें इत्यादि समर्पण करण्याचा मंत्रः )

**ॐ मनसः काममाकूतिं वाचः सत्यमशीमहि ।**
**पशूनांरूपमन्यस्य मयिश्रीः श्रयतां यशः ॥**
**मंदारपारिजातादि पाटली केतकानि च ।**
**जाति चंपक पुष्पाणि गृहाणेमानि शोभने ॥**
**पद्म शंखज पुष्पादि-शतपत्रै र्विचित्रतां ।**
**पुष्पमालां प्रयच्छामि गृहाण त्वं सुरेश्वरि ॥**

**श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्यो नमः यथा कालोद्भव पुष्पाणि समर्पयामि । बिल्वपत्रं दूर्वांकुराणिच समर्पयामि । पुष्पमालांच समर्पयापि * नानाविध पत्राणि च समर्पयाभि**

## अंगपूजा

( फुलें, तुलसीपत्रें इत्यादि वाहून झाल्यावर श्रीदेवीच्या विविध अंगांची पूजा करण्याची पद्धति आहे. त्यासाठीं पुढील देवीच्या नांवांचा व अंगोपांगांचा उच्चार करून अक्षता वहातात. त्या अशाः— )

* पुष्पमाला, घटाला-कलशाला बांधावीं.

दुर्गायै नमः पादौ पूजयामि ।
महाकाल्यैनमः गुल्फौ पूजयामि ।
मंगलायैनमः जानुद्वयं पूजयामि ।
कात्यायन्यैनमः उरू पूजयामि ।
भद्रकाल्यैनमः कटिं पूजयामि ।
कमलवासिन्यैनमः नाभिं पूजयामि ।
शिवायैनमः उदरं पूजयामि ।
क्षमायैनमः हृदयं पूजयामि ।
कौमार्यैनमः स्तनौ पूजयामि ।
उमायैनमः हस्तौ पूजयामि ।
महागौर्यैनमः दक्षिणबाहुं पूजयामि ।
वैष्णव्यैनमः वामबाहुं पूजयामि ।
रमायैनमः स्कंधौ पूजयामि ।
स्कंदमात्रेनमः कंठं पूजयामि ।
महिषमर्दिन्यैनमः मुखं पूजयामि ।
महेश्वर्यैनमः शिरः पूजयामि ।
कात्यायन्यैनमः सर्वाङ्गं पूजयामि ।

धूप—( धूप—उदबत्ती इत्यादि समर्पण करण्याचा मंत्रः— )

ॐकर्दमेनप्रजाभूता मयिसंभव कर्दम ।
श्रियंवासयमे कुले मातरं पद्म मालिनीम् ॥
दशाङ्गं गुग्गुलं धूपं चंदनागरुसंयुतं ।
समर्पितं मया भक्त्या लक्ष्मि त्वं प्रतिगृह्यताम् ॥
श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती--नवदुर्गादेवताभ्यो-
नमः धूपं समर्पयामि—

## दीप

( नीरांजन दीप समर्पण करण्याचा मंत्रः— )

ॐ आपस्त्रजंतु स्निग्धानि चिक्लीतवसमे गृहे ।
नीचदेवीं मातरं श्रियं वासय मे कुले ॥
घृतवर्तिसमायुक्तं महातेजो महोज्ज्वलं ।
दीपं दास्यामि गिरिजे सुप्रीता भव सर्वदा

श्रीमहाकाली–महालक्ष्मी–महासरस्वती–नवदुर्गादेवताभ्यो-नमः दीपं समर्पयामि

## नैवेद्य

( दूध, नारळाचे चूर्ण, साखर, केळी इत्यादि पदार्थ खाण्यासाठीं देणें असा हा उपचार आहे. श्रीदेवीसमोर शुद्ध पात्रांत हे पदार्थ ठेवून तुलसीपत्रानें प्रोक्षण करावें; आणि पुढें दिल्याप्रमाणें मंत्र म्हणून हा नैवेद्य अर्पण करावा.

या तात्पुरत्या व अल्प नैवेद्य प्रमाणेंच नानाविध पक्वान्नांचा नैवेद्य या वेळींच किंवा नंतर कांहीं वेळानें भोजनप्रसंगीं अर्पण करतात. त्याला महानैवेद्य म्हणतात. त्या वेळींही हेच मंत्र म्हणतात. महानैवेद्याचें प्रोक्षण गायत्रीमंत्रानें करतात. इतर विधि वरीलप्रमाणेंच )

ॐ आर्द्रां पुष्करिणीं पुष्टीं पिंगलां पद्ममालिनीम् ।
चंद्रां हिरण्मयीं लक्ष्मीं जातवेदो ममावह ॥
अन्नं चतुर्विधं स्वादुरसैः षड्भिः समन्वित ।
नैवेद्यं गृह्यतां देवि भक्तिं मेह्यचलां कुरु

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्यो नमः
नैवेद्यार्थे दुग्ध-नारिकेलफलचूर्ण-शर्करा-रंभाफल (इ०)
नैवेद्यं समर्पयामि
पूर्वं आचमनीयं समर्पयामि

ॐ प्राणायस्वाहा । ॐ अपानायस्वाहा ।
ॐ व्यानायस्वाहा । ॐ उदानायस्वाहा ।
ॐ समानायस्वाहा । ॐ ब्रह्मणेस्वाहा । *
नैवेद्यमध्ये पानीयं समर्पयामि
हस्तप्रक्षालनं समर्पयामि । मुखप्रक्षालनं समर्पयामि
करोद्वर्तनार्थे चंदनं समर्पयामि ।

( महानैवेद्य समर्पण करतांना अन्नपदार्थ वाढलेलें पान श्रीदेवीसमोर चतुष्कोणाकृति मंडल काढून त्यावर ठेवतात. आणि ज्या तुळसीपत्रानें प्रोक्षण केलें असेल तें तुळसीपत्र नंतर श्रीदेवीवर-घटावर इ. घालावें. )

## तांबूल

( हा भोजनोत्तर-उपचार आहे. भोजन झाल्यावर पाहुण्याला विडा देतात, त्याप्रमाणें या सर्वशक्तिमान देवीला आपण आवाहन करून बोलाविलेलें असतें तेव्हां भोजनोत्तर हा उपचार करणें ओघानेंच येतें. विड्याच्या दोन किंवा पांच पानांवर एक सुपारी ठेवणें हा नेहमींचा या बाबतींतला साधा प्रकार आहे. या वेळीं पुढील मंत्र म्हणावा:— )

पूगीफलं महद्दिव्यं नागवल्लीदलैर्युतम् ।
कर्पूरैलासमायुक्तं तांबूलं प्रतिगृह्यताम् ।।
श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्योनमः
मुखवासार्थे पूगीफल–तांबूलं समर्पयामि ।।

## दक्षिणा

( विड्याबरोबर दक्षिणा म्हणून कांहीं द्रव्य देण्याचा प्रघात आहे. हें द्रव्य बहुधा विड्यावरच ठेवतात. त्यासंबंधीं मंत्र असा:— )

* प्राणायनमः । अपानायनमः । व्यानायनमः । उदानायनमः । समानायनमः । ब्रह्मणेनमः । असेंही विशेषतः स्त्रिया म्हणतात.

हिरण्यगर्भगर्भस्थं हेमबीजं विभावसोः ।
अनंतपुण्यफलदमतः शांतिं प्रयच्छ मे ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्यो नमः
सुवर्णपुष्प+ दक्षिणां समर्पयामि

## नारिकेलादि फलें

[ भोजनोत्तर फळें—विशेषतः नारळ-बदाम-खारीक इत्यादि खाण्याचा प्रघात निदान श्रीमंतांकडे तरी असतोच. त्याला अनुसरून श्रीदेवीला अशीं फळें—निदान नारळ तरी अर्पण करण्याचा मंत्रः— ]

इदं फलं मया देव स्थापितं पुरतस्तव ।
तेन मे सुफलावाप्तिर्भवेत् जन्मनि जन्मनि ॥ १ ॥
द्राक्षा खर्जूर कदली पनसाम्र कपित्थकम् ।
नारिकेलेक्षु जंब्वादि फलानि प्रतिगृह्यताम् ॥ २ ॥
फलेन फलितं सर्वं त्रैलोक्यं सचराचरं ।
तस्मात् फलप्रदानेन सफलाः स्युर्मनोरथाः ॥ ३ ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्यो नमः
नारिकेफलं ( पनस—जंबू—कदलीफलम् इ० ) समर्पयामि

## शेषोपचार

[ या उपचारांव्यतिरिक्त छत्र-चामर-दर्पण-गीत-वाद्य-नृत्य इत्यादि उपचार हे आत्मसंतोष व उत्सवांग किंवा राजोपचार म्हणून अर्पण करावयाचे असतां सामान्यपणें पुढीलप्रमाणें उच्चार करून अर्पण करावें:— ]

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्यो नमः
छत्रचामर—दर्पण—गीत—वाद्यादि शेषोपचारान् समर्पयामि

+ सुवर्णपुष्प म्हणजे सोन्याचें फूल. श्रीमंतांना हें शक्य आहे. पण गरिबांनाहि मनोमय तशी कल्पना करतां येईलच ! एर्वीतेर्वी हें सर्व कल्पनेचेच खेळ आहेत.

(किंवा नुसत्या कल्पनेवर भागवावयाचें असल्यास) शेषो-पचारार्थे (किंवा) सर्वोपचारार्थे अक्षतान् समर्पयामि ।

## मालाबंधन

[ या पूजेंत घटावर—मंडपीपासून खालीं लोंबती विविध फुलांची माला बांधणें हा एक विधि आहे. कित्येक कुटुंबांत ही माला चढती असते; म्हणजे पहिल्या दिवशीं एक, दुसऱ्या दिवशीं दोन, तिसऱ्या दिवशीं तीन याप्रमाणें नवव्या दिवशीं नऊ बांधतात. त्यासाठीं म्हणावयाचा मंत्रः— ]

मालाहि सर्व देवानां प्रीतिदा शुभदा यतः ।
लंबितासौ मया भक्त्या गृहाण जगदंबिके ॥ १ ॥
ग्रथितां तिलकल्हारजातिमंदार चंपकैः ।
पुष्पमालां प्रयच्छामि प्रथमेन्हि तवांबिके ॥ २ ॥
श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्योनमः पुष्पमालां समर्पयामि

[ दुसऱ्या दिवशीं 'द्वितीयेन्हि' - व त्यापुढें - 'तृतीयेन्हि' 'चतुर्थेन्हि' 'पंचमेन्हि' - 'षष्ठेन्हि' - 'सप्तमेन्हि' - 'अष्टमेन्हि' - 'नवमेन्हि' याप्रमाणें इथें बदल करावा. ]

## प्रदक्षिणा

[ प्रदक्षिणा ही घटाच्या उजवीकडून आरंभ करून घटाच्या पाठी-मागून डावीकडून मूळ पदावर येऊन पुरी करावयाची असते. जिथें ही सोय नसेल म्हणजे जिथें घटाची मांडावळ भिंतीला टेंकूनच केलेली असेल तिथें ही प्रदक्षिणा स्वतःभोंवतीं फिरूनच करावी. ह्यावेळीं म्हणावयाचा मंत्रः— ]

ॐ आर्द्रां यःकरिणीं यष्टीं पिंगलां पद्ममालिनीम् ।
चंद्रां हिरण्मयीं लक्ष्मीं जातवेदो ममावह ॥

यानिकानिच पापानि जन्मांतरकृतानिच ।
तानि तानि विनश्यन्ति प्रदक्षिणपदेपदे ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्योनमः
प्रदक्षिणां समर्पयामि

## नमस्कार

(नमस्कार हा पंधरावा उपचार आहे. हा साष्टांग म्हणजे छाती-मस्तक-दृष्टि-मन आणि वाणी त्याचप्रमाणें पाय-हात आणि मांड्या हीं आठ अंगें देव्यर्पण करून करावयाचा असतो. अर्थात् छाती - मस्तक - पाय - हात आणि मांड्या जमिनीला टेंकावयाच्या, दृष्टि देवीकडे-घटाकडे वळवावयाची. मनांत श्रीदेवीचें स्वरूप उभें करावयाचें आणि तोंडानें तिच्या नामाचा उच्चार करावयाचा असतो. सर्व लक्ष श्रीदेवीकडेच केंद्रित करावयाचें असा यांत हेतु असतो. ह्यावेळीं म्हणावयाचा मंत्रः— )

ॐतांम आवह जातवेदो लक्ष्मीमलपगामिनीम् ।
यस्यां हिरण्यं प्रभूतं गावो दास्योऽश्वान् विंदेयं पूरुषानहम् ॥
नमस्ते देवि देवेशि नमस्ते ईप्सितप्रदे ।
नमस्ते देविदेवेशि नमस्ते शंकरप्रिये ॥

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्योनमः
नमस्करोमि ( अनेक नमस्कार घालावयाचे असल्यास ) नमस्कारान्
समर्पयामि

## महानीरांजनदीप-कर्पूरार्तिक्य इ.

( हा निरांजनांत मोठ्या फुलवाती, कापूर इत्यादि द्रव्यें पेटवून दाखवावयाचा असतो. त्यासाठीं म्हणावयाचे मंत्रः— )

ॐ श्रिये जातः श्रिय आनिरीयाय श्रियं वयो जरितृभ्यो ददाति ।
श्रियं वसाना अमृतत्त्वमायम् भवंति सत्या स मिथामितद्रौ ॥

श्रिय एवैनं तच्छ्रियामा दधाति संततमृचा वषट् कृत्यं ।
संतत्यै संधीयते प्रजया पशुभिर्य एवं वेद ॥
याज्यया यजति प्रत्तिर्वै याज्या पुण्यैव लक्ष्मीः ।
पुण्यामेव तल्लक्ष्मींसंभावयति पुण्यां लक्ष्मीं संस्कुरुते ॥
कौशेयवर्ति संयुक्तं गोघृतेन समन्वितं ।
नीरांजनं मया दत्तं गृहाण परमेश्वरि ॥ १ ॥
श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्योनमः
महानीरांजनदीपं कर्पूरार्तिक्यंच समर्पयामि ॥

[ हा महानीरांजनदीप आणि आर्तिक्य दीप दाखवितांनाच पंचारतीही ओंवाळतात. पंचारती म्हणजे ज्यांत पांच वाती—ह्यांची नेहमींच जोडी असावी-राहतील असें भांडें. तुपांत, किंवा तेलांत भिजविलेल्या ह्या वाती त्या भांड्यांत ठेवून त्या जळत्या राहण्यासाठीं तें भांडें तुपानें किंवा तेलानें भरून वाती पेटविल्या म्हणजे ती पंचारती झाली. ]

आरत्या म्हणावयाच्या त्या व्यक्तिशः वा समूहशः याच वेळीं म्हणाव्या.

## मंत्रपुष्प

[ हा षोडशोपचारांपैकीं शेवटचा उपचार आहे. आरत्या म्हणून झाल्यावर ‘ देवे ’ नांवाचे मंत्र आहेत. ते ईशप्रार्थनेचे आहेत. ते सर्व किंवा तशी सवड नसल्यास त्यांपैकीं कांहीं म्हणावयाचे—निदान “ ॐ यज्ञेन यज्ञमयजन्त देवा० ” इत्यादि पुरुषसूक्तांतील एक ऋचा म्हणून त्यांत पुढील मंत्राचा समावेश करावयाचा व त्यानंतर पुढें दिलेली राष्ट्रीय प्रार्थना म्हणून झाल्यावर गंधयुक्त फुलें नि अक्षता ओंजळींत घेऊन श्रीदेवीला—घटाला वहावयाचीं. इतर जमलेल्या व राष्ट्रीय प्रार्थनेंत भाग घेतलेल्या मंडळींनींही वर सांगितल्याप्रमाणें पुष्पांजलि वहावयाची असते. त्यासंबंधीचे मंत्र पुढीलप्रमाणें:— ]

ॐ यः शुचिः प्रयतो भूत्वा जुहुयादाज्यमन्वहम् ।
सूक्तं पंचदशर्चंच श्रीकामः सततं जपेत् ॥
नमस्ते देविदेवेशि नमस्ते ईप्सितप्रदे ।
नमस्ते देविदेवेशि नमस्ते शंकरप्रिये ॥
ॐ महालक्ष्मीच विद्महे विष्णुपत्नीच धीमहि ।
तन्नो लक्ष्मीः प्रचोदयात् ॥
श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्यो नमः
मंत्रपुष्पं समर्पयामि ॥

## राष्ट्रीय प्रार्थना

ॐराजाधिराजाय प्रसह्य साहिने । नमोवयं वैश्रवणाय कुर्महे ।
समेकामान् कामकामाय मह्यम् । कामेश्वरो वैश्रवणो ददातु ।
कुबेरायवैश्रवणाय । महाराजाय नमः ॥
ॐस्वस्ति । साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं पारमेष्ठ्यं राज्यं ।
माहाराज्यमाधिपत्यमयं समंत पर्यायीस्यात् सार्वभौमः ।
सार्वायुष आंतादापरार्धात् पृथिव्यै समुद्रपर्यंताया एकराळिति ।
तदप्येषः श्लोकोऽभिगीतो । मरुतः परिवेष्टारो मरुत्तस्या वसनगृहे ।
आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासद इति ॥
यो वैतां ब्रह्मणो वेद । अमृतेनामृतां पुरीं ।
तस्मै ब्रह्मच ब्रह्माच आयुःकीर्तिं प्रजां ददुः ॥

## पुनःप्रार्थना

(ह्याप्रमाणें पूजा झाल्यावर पुनः एकदां श्रीदेवीची प्रार्थना करून तीर्थग्रहण करावयाचें व या पूजेनें श्रीदेवी प्रसन्न होवो असें मागणें मागून पूजासमाप्ति करावयाची असते. ह्या वेळची प्रार्थना पुढील-प्रमाणें:— )

आवाहनं न जानामि न जानामि तवार्चनम् ।
पूजां चैव न जानामि क्षम्यतां परमेश्वरि ॥
मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वरि ।
य-पूजितं मया देवि परिपूर्णं तदस्तु मे ॥
अन्यथा शरणं नास्ति त्वमेव शरणं मम ।
तस्मात् कारुण्यभावेन रक्षस्व परमेश्वरि ॥
लक्ष्मि त्वत्प्रज्ञया नित्यं कृतापूजा तवाज्ञया ।
स्थिरा भव गृहे ह्यस्मिन् मम संतानकारिणि ॥
न्यूनं वाप्यधिकं वापि यन्मया मोहतः कृतम् ।
सर्वं तदस्तु संपूर्णं त्वत्प्रसादात् महेश्वरि ॥
महिषघ्नि महामाये चामुंडमुंडमालिनी ।
द्रव्यमारोग्यविजयं देहि देवि नमोऽस्तुते ॥
भूतप्रेतपिशाचेभ्यो रक्षोभ्येश्च महेश्वरि ।
देवेभ्यो मानुषेभ्यश्च भयेभ्यो रक्ष मां सदा ॥
अपराधसहस्राणि क्रियंतेऽहर्निशं मया ।
दासोऽहमिति मां मत्वा क्षमस्व परमेश्वरि ॥
क्षमस्व परमेश्वरि । क्षमस्व परमेश्वरि ॥ समर्पण
अनेन ध्यानावाहनादि षोडशोपचारपूजनेन भगवती
श्रीमहाकाली – महालक्ष्मी – महासरस्वती – नवदुर्गा-
कुलदेवताः प्रीयंताम् । ॐ तत्सद् ब्रह्मार्पणमस्तु ।
विष्णवे नमो । विष्णवे नमो । विष्णवे नमः ।

उदयोस्तु ! जय जगदंब ! !

( शेवटीं दोन वेळां आचमन करावें. )

## तीर्थग्रहणमंत्र

(हें बहुधा देवीला घातलेल्या स्नानाचें-अभिषेकाचें-अगर देवीच्या घटाला स्पर्शविलेल्या पाण्याचें ग्रहण करतात. आचमनाच्या वेळीं हाताची जी आकृति करतात तीच आकृति करून त्यांत हें पाणी घेऊन प्राशन करतात. त्यावेळीं म्हणावयाचा मंत्रः—)

**अकालमृत्युहरणं सर्वव्याधिविनाशनम् ।**
**देवीपादोदकं तीर्थं जठरे धारयाम्यहम् ।।**

## ९ सायंकाळची ( पंचोपचार ) पूजा

(ही बहुधा पंचोपचार पूजा असते. सायंकाळीं शुचिर्भूत होऊन श्रीदेवीसमोर बसून आचमन प्राणायाम इत्यादि प्राथमिक कृत्यें केल्यावर करावयाचा संकल्पः—)

**तिथिर्विष्णुस्तथावारो नक्षत्रं विष्णुरेवच ।**
**योगश्च करणं चैव सर्वं विष्णुमयं जगत् ।।**

**अद्य पूर्वोच्चरित वर्तमान एवंगुण विशेषण विशिष्टायां शुभपुण्यतिथौ मम आत्मनः श्रुतिस्मृति पुराणोक्त फलप्राप्त्यर्थं अस्माकं सर्वेषां सहकुटुंबानां क्षेम-स्थैर्य-विजय-अभय-आयुरारोग्य-ऐश्वर्याभिवृद्ध्यर्थं द्विपदचतुष्पदसहितानां शांत्यर्थं-पुष्ट्यर्थं-तुष्ट्यर्थं समस्तमंगलावाप्त्यर्थं समस्ताभ्युदयार्थंच श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवता प्रीत्यर्थं-पंचोपचारपूजनमहं करिष्ये ।।**

**अथध्यान—ॐ नमोदेव्यै महादेव्यै शिवायै सततं नमः ।**
**नमः प्रकृत्यै भद्रायै नीयताः प्रणताास्ताम् ।।**

श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती-नवदुर्गादेवताभ्योनमः ध्यायामि ॥

श्रीखंडंचंदनं दिव्यं गंधाढ्यं सुमनोहरम् ।
विलेपनं सुरश्रेष्ठि चंदनं प्रतिगृह्यताम् ॥
श्रीमहाकाली इ०- देवताभ्यो नमः
विलेपनार्थे चंदनं समर्पयामि ( गंध लावावें. )
माल्यादीनि सुगंधीनि मालत्यादीनि वै प्रभो ।
मयार्पितानि पूजार्थं पुष्पाणि प्रतिगृह्यताम् ॥
श्रीमहाकाली इ०- देवताभ्यो नमः
पूजार्थे पुष्पाणि समर्पयामि । ( फुलें वहावीं. )
वनस्पतिरसोद्भूतो गंधाढ्यो गंध उत्तमः ।
आघ्रेयः सर्व देवानां धूपोयं प्रतिगृह्यताम् ॥
श्रीमहाकाली इ०—देवताभ्यो नमः
सुवासार्थे धूपं समर्पयामि
( धूप उदबत्ती वगैरे ओंवाळून दाखवावी. )
आज्यंचवर्तिसंयुक्तं वन्हिना योजितं मया ।
दीपं गृहाण देवेशि त्र्यैलोक्यतिमिरापह ॥
श्रीमहाकाली इ०—देवताभ्यो नमः
दीपार्थे नीरांजनदीपं समर्पयामि
( उजव्या हातानें नीरांजनदीप देवापुढें ओंवाळावा व डाव्या हातानें घंटा वाजवावी. )
नैवेद्यं गृह्यतां देवि भक्तिं मे ह्यचलांकुरु ।
ईप्सितं मे वरं देहि परत्र च परां गतिम् ॥
श्रीमहाकाली इ०—देवताभ्यो नमः

**नैवेद्यार्थे यथांशतः दुग्ध-शर्करा-नारिकेलफलचूर्ण-खाद्य-नैवेद्यं समर्पयामि**

(दूध-साखर-नारळाचा कीस-पंचखाद्य इत्यादि जे पदार्थ अर्पण करावयाचे असतील ते श्रीदेवीपुढें ठेवून ताह्मनांत तुलसीपत्रयुक्त पाणी सोडावें व आपला डावा हात स्वतःच्या डोळ्यांवर धरून उजव्या हातानें जणूं आपण देवाला भरवीत आहों अशा प्रकारें देवापुढें कृति करावी.)

**ॐ प्राणायस्वाहा । ॐ अपानायस्वाहा ।**
**ॐ व्यानायस्वाहा । ॐ उदानायस्वाहा ।**
**ॐ समानायस्वाहा । ॐ ब्रह्मणेस्वाहा ।**

अथवा

**ॐ प्राणायनमः । ॐ अपानायनमः ।**
**ॐ व्यानायनमः । ॐ उदानायनमः ।**
**ॐ समानायनमः । ॐ ब्रह्मणेनमः ।**

यानंतर महानीरांजनदीप-कर्पूरदीप-पंचारती इ० ओंवाळून आरत्या म्हणाव्या. देवे म्हणावें. राष्ट्रीय प्रार्थना म्हणावी. व मंत्रपुष्प श्रीदेवीला समर्पण करावा. आणि शेवटीं प्रदक्षिणा-नमस्कार करून पूजासमाप्तीचे पुढील मंत्र म्हणून प्रार्थना करावी:— )

**आवाहनं न जानामि न जानामि तवार्चनम् ।**
**पूजां चैव न जानामि क्षम्यतां परमेश्वरि ॥**
**मंत्रहीनं क्रियाहिनं भक्तिहीनं सुरेश्वरि ।**
**यत्पूजितं मया देवि परिपूर्णं तदस्तु मे ॥**
**अन्यथा शरणं नास्ति त्वमेव शरणं मम ।**
**तस्मात् कारुण्यभावेत न रक्षस्व परमेश्वरि ॥**

*

अपराधसहस्राणि क्रियंतेऽहर्निशं मया ।
दासोऽहमिति मां मत्वा क्षमस्व परमेश्वरि ॥
क्षमस्व परमेश्वरि । क्षमस्व परमेश्वरि ॥

अनेन कृतपंचोपचारपूजनेन भगवती–श्रीमहाकाली–महालक्ष्मी–महासरस्वती–नवदुर्गादेवताः प्रीयंताम् ।

ॐ तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु ।
विष्णवेनमो । विष्णवेनमो ।
विष्णवेनमः ॥
उदयोस्तु ! जय जगदंब !

( शेवटीं दोन वेळां आचमन करावें. )

तीर्थग्रहण दुपारच्याप्रमाणें.

## १० नवाहांतील नित्यपूजा

( याप्रमाणें नऊ दिवस श्रीदेवीची–घटाची पूजा करीत जावी. रोज दिवसा षोडशोपचार पूजा व रात्रौ पंचोपचार पूजा करावी. अंगपूजा करण्याचें कारण नाहीं. निर्माल्य काढतांना फक्त फुलें तेवढी काढावी. स्नान प्रोक्षणद्वारेंच घालावें. धान्य रुजत घातलेलें असतें त्यावर रोज पूजेच्या वेळीं पाणी शिंपडावें. नंददीपाकडे अहोरात्र लक्ष ठेवावें. )

या नवरात्रोत्सवांत कुलाचाराप्रमाणें अष्टमीला-नवमीला अगर दशमीला नवरात्रोत्थापन करावयाचें असतें. तोंपर्यंत सर्वत्र शुचिर्भूतपणा असावा.

## ११ उत्थापन–विसर्जन इ.

( नित्याप्रमाणें षोडशोपचार पूजा, महानैवेद्यसमर्पण, मालाबंधन इत्यादि पूजा समाप्त झाल्यावर हें नवरात्रोत्थापन–घटोत्थापन–करावयाचें असतें. त्यासंबंधीं मंत्र-तंत्र पुढीलप्रमाणें:— )

आचमन-प्राणायाम इत्यादि झाल्यावर संकल्प करावा, तो असा:—

संकल्प :– तिथिर्विष्णुस्तथावारो नक्षत्रं विष्णुरेव च ।
योगश्चकरणंचैव सर्वे विष्णुमयं जगत् ॥
अद्य पूर्वोच्चरित वर्तमान एवंगुण विशेषण विशिष्टायां
शुभपुण्यातिथौ–श्रीमहाकाली-महालक्ष्मी-महासरस्वती
नवदुर्गादि स्थापितदेवतानां उत्थापनं करिष्ये

( असें म्हणून ताम्हनांत पाणी सोडावें. )

" तथाच पंचोपचार पूजनमहं करिष्ये "

( असें म्हणून पंचोपचार पूजा करावी आणि पुढीलप्रमाणें प्रार्थना करावी. )

प्रार्थना :– दुर्गां शिवां शांतिकरीं ब्रह्माणीं ब्रह्मणप्रियां ।
सर्वलोकप्रणेत्रीं च तां नमामि सदाशिवाम् ॥ १ ॥
विधिहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं यदर्चितं ।
पूर्णं भवतु तत्सर्वं त्वत्प्रसादात् महेश्वरि ॥ २ ॥

( अशी प्रार्थना करून हात जोडावे आणि )

" मातः क्षमस्व । ॐ दुर्गायैनमः "

असें म्हणून कलशावरील ईशान्येच्या बाजूचें एक फूल काढावें आणि पुढील मंत्र म्हणावें:—

विसर्जन मंत्र :-उत्तिष्ठ देवि चंडेशि शुभां पूजां प्रगृह्य च
कुरुष्व मम कल्याणमष्टाभिः शक्तिभिः सह ॥
गच्छ गच्छ परं स्थानं स्वस्थानं देवि चंडिके
व्रज स्रोतोजलैर्वृध्यै तिष्ठ गेहेच भूतये ॥
दुर्गे देवि जगन्मातः स्वस्थानं गच्छ पूजितः ।
संवत्सरे व्यतीते तु पुनरागमनाय वै ॥
पूजामिमां मया देवि यथाशक्ति निवेदिताम्
रक्षणार्थं समादाय व्रज स्थानमनुत्तमम् ॥

याप्रमाणें प्रार्थना करून देवीवर अक्षता घालाव्या आणि घट हलवावा. घटांतील पाणी थोडें काढून घेऊन कुटुंबांतील सर्व मंडळींवर मार्जन करून तीर्थ घ्यावें आणि बाकीचें त्याचप्रमाणें माळा वगैरे सर्व निर्माल्य नदी विहीर इत्यादि जलांत नेऊन सोडावा. नऊ दिवसांत धान्यांना अंकुर आलेले असणारच. ते काढून ब्राह्मण–सुवासिनी–इष्टमित्रांना द्यावे.

अन्नसंतर्पण, दक्षिणा वगैरे यथाशक्ति देऊन हा उत्सव पुरा करावा.

## १२ नवरात्रांतील इतर पूजा.

### १ ललितापंचमी+

आश्विन शु ॥ ५ ला कित्येक कुटुंबांत 'उपांगललितादेवी' ची पूजा करतात. तिचा **ध्यानमंत्रः—**

**नमो देव्यै महादेव्यै शिवायै सततं नमः**

**नमः प्रकृत्यै भद्रायै नियताः प्रणताः स्म ताम् ॥ १ ॥**

**प्रार्थनामंत्रः—**

**सर्वमंगलमांगल्ये शिवे सर्वार्थसाधिके ।**

**शरण्ये त्र्यंबके गौरि नारायणि नमोऽस्तुते ॥ १ ॥**

### २ श्रीमहालक्ष्मीव्रतांगपूजा*

आश्विन शु ॥ ८ हा श्रीमहालक्ष्मीव्रताचा दिवस आहे. हें व्रत महाराष्ट्रांत फक्त चित्तपावन ब्राह्मण समाजांत प्रचलित आहे. तें लग्नानंतर पांच वर्षेपर्यंत आचरावयाचें असतें.

---

+सविस्तर पूजा तत्संबंधी पुस्तकांत पहावी.

* विस्तृत पूजेसाठीं प्रस्तुत लेखकाचें "श्रीमहालक्ष्मी" हें पुस्तक पहावें.

या दिवशीं सकाळीं श्रीदेवीच्या प्रतीकाची ( रोजच्या पूजेंतील श्रीअन्न-पूर्णादेवीची मूर्ति किंवा नुसती सुपारीही प्रतीक म्हणून घेतात. ) पंचारती-युक्त पूजा व रात्रौ तांदुळांच्या पिठाच्या महालक्ष्मीची मूर्ति करून तिची पूजा ( बहुधा ही सामुदायिक असते. ) करण्याची चाल आहे.

धानमंत्रः—

**या सा पद्मासनस्था विपुलकटितटी पद्मपत्रायताक्षी ।**
**गंभीरावर्तनाभिस्तनभरनमिता शुभ्रवस्त्रोत्तरीया ॥**
**लक्ष्मीर्दिव्यैर्गजेंद्रैर्मणिगणखचितैः स्थापिता हेमकुंभैः ।**
**नित्यं सा पद्महस्ता मम वसतु गृहे सर्वमांगल्ययुक्ता ॥ १ ॥**

किंवा

**नमो देव्यै महादेव्यै शिवायै सततं नमः ।**
**नमः प्रकृत्यै भद्रायै नीयतः प्रणतः स्म ताम् ॥ १ ॥**

( याच मंत्रानें सोळा अर्घ्यें देतात. )

या पूजेनंतर १६ गांठींचा एक दोरा पूजिकेनें आपल्या डाव्या हाताला बांधावयाचा असतो. त्यावेळीं म्हणावयाचा मंत्रः—

**धनंधान्यं धरां धर्मं कीर्तिमायुर्यशः श्रियम् ।**
**तुरगान् दंतिनः पुत्रान् महालक्ष्मि प्रयच्छ मे ॥ १ ॥**

हा दोरा नंतर दुसऱ्या दिवशीं सकाळीं मूर्तिविसर्जनाच्या वेळीं देवीपुढें ठेवून मंत्र म्हणावयाचा तो असाः—

**लक्ष्मीर्देवि गृहाण त्वं दोरकं यन्मयाधृतम् ।**
**व्रतं संपूर्णतां यातु कृपां कुरु सदा मयि ॥ १ ॥**

रात्रौ पिठाची मूर्ति तयार झाल्यावर तिची इतर मृण्मय देवतांप्रमाणें प्राणप्रतिष्ठा वगैरे करून पूजा करतात. त्यावेळीं म्हणावयाचे ध्यानमंत्र असेः-

**ध्यायामि तां महालक्ष्मीं कर्पूरक्षोदपांडुराम् ।**
**शुभ्रवस्त्रपरीधानां मुक्ताभरणभूषिताम् ॥ १ ॥**

पंकजासनसंस्थानां स्मेरारन सरोरुहाम् ।
शारदेन्दुकुलां कान्ति स्निग्धनेत्रां चतुर्भुजाम् ॥ २ ॥
पद्मयुग्माभयवरव्यग्रं चारु करांबुजाम् ।
अभितो गजयुग्मेन सिच्यमाना करांबुना ॥ ३ ॥

पूजा झाल्यावर मूर्तीपुढें नृत्य-गायन करतात. 'घागरी फुंकणें' हा विशेष कार्यक्रम असतो. ही घागरफुंकणी चालू असतां एकाद्या सुवासिनीच्या अंगांत देवी संचार करतें आणि ती तिच्या मुखानें इच्छुकांना अनेक प्रकारचीं यथोचित उत्तरें देऊन त्यांना मार्गदर्शन करते, अशी समजूत आहे. मूर्तीचें विसर्जन करावयाचें तें दुसऱ्या दिवशीं सूर्योदयापूर्वी करावयाचे असतें. या वेळीं पंचोपचारपूजा करून आरत्या, मंत्रपुष्प, प्रार्थना इत्यादि झाल्यावर मूर्तीवर विसर्जनाच्या अक्षता वाहतांना पुढील मंत्र म्हणावाः—

यान्तु देवगणाः सर्वे पूजामादाय पार्थिवीम् ।
इष्टकामप्रसिद्ध्यर्थं पुनरागमनाय च ॥ १ ॥

"उदयोऽस्तु" ही या देवीची घोषणा आहे.

## ३ बोडण

या चित्तपावन ब्राह्मणसमाजांतच कुलस्वामिनीची एका विशिष्ट प्रकारें पूजा करण्याची चाल आहे. त्याला 'बोडण भरणें' असें म्हणतात. 'बोडण' याचें मूळ संस्कृत 'मोटण' असें असून देशस्थ ब्राह्मणांत याच अर्थाचा 'बढण' हा शब्द प्रचारांत आहे. तो 'वर्धन' शब्दाचा अपभ्रंश आहे.

चित्तपावनांच्या अनेक कुटुंबांत लग्न, मुंज, प्रसूति इत्यादि मंगलकार्यानंतर हें बोडण भरलें जातें.

आश्विन शु॥ १ पासून दशमीपर्यंतच्या नवरात्रांत एकाद्या दिवशीं ही पूजा करण्याची वहिवाटहि पुष्कळ ठिकाणीं आहे.

ज्या कुटुंबांत नवरात्रांत देवीची विशिष्ट स्थळीं स्थापना केलेली नसते त्या कुटुंबात हें बोडण नवरात्रांत केव्हांही भरतां येतें, पण जिथें घटस्थापना वगैरे करून देवीची विशिष्ट स्थळीं स्थापना केलेली असते तिथें नवरात्रोत्सव संपेपर्यंत ती देवी तिथून हालवितां येण्यासारखी नसल्यामुळें हें बोडण नवरात्रोत्थापनानंतर ( दसऱ्यापासून पौर्णिमेपर्यंत ) एखाद्या दिवशीं भरलें जातें.

कांहीं घराण्यांत ही चाल प्रतिवार्षिक, कांहींत एकवर्षाआड, नि कांहींत नैमित्तिकही आहे.

या पूजेला निर्बंधही बरेच आहेत. ज्या दिवशीं बोडण भरावयाचें त्या दिवशीं कुटुंबांत कोणी गरोदर स्त्री असतां नये, इतकेंच नव्हे तर घरच्या गाई-म्हशींतही कोणी गाभण असतां नये असा मुख्य निर्बंध आहे. घरीं गाईचें दुभतें असलें तरच हें बोडण भरण्याची चाल कित्येक कुटुंबांत आहे. कारण गाईचें दूध—दहीं—तूप याला लागत असतें.

एका मोठ्या पात्रांत घरच्या देवीची मूर्ति ( श्री अन्नपूर्णा वगैरे ) ठेवून तिची पूजा करावयाची आणि सभोंवतीं पांच सुवासिनींनीं × बसून त्या पात्रांत दूध-दहीं-तूप-मध-साखर हीं पांच द्रव्यें एकत्र घालून तीं सर्वांनीं मिळून कालवावयाचीं असा हा विधि आहे. म्हणजे या देवीला—आपल्या कुलस्वामिनीला—हें पंचामृताचें स्नान आहे. +

× या सुवासिनी मुलेंबाळें हयात असलेल्या असाव्या लागतात.

+ कांहीं घराण्यांत हें बोडण न कालवितां श्रीदेवीची पूजा वगैरे करून नुसत्या सुवासिनीच भोजनाला सांगतात.

पुढें या देवीला नैवेद्य वगैरे दाखवून आरत्या म्हणावयाच्या, प्रार्थना करावयाची आणि ब्राह्मण–सुवासिनी–कुमारिकाभोजन घालून ही पूजा संपवावयाची असते. ÷ ÷

देशस्थ ब्राह्मण समाजांत बोडण भरण्याची चाल नाहीं. तथापि कणकीचे अनेक पदार्थ तळून ते ताटांत भरून देवीपुढें ठेवावयाचे व त्यांचा नैवेद्य दाखवावयाचा अशी रूढि कित्येक कुटुंबांत आहे.

## ४ शस्त्रपूजा ( खांडेनवमी )

आश्विन शु॥ ९ ही 'खड्गनवमी' अथवा 'खांडेनवमी' होय. या दिवशीं खडग–शस्त्रपूजा करण्याची चाल अनेक कुटुंबांत दिसून येते. पूर्वी दसऱ्याच्या दिवशीं शमीपूजन झाल्यावर तरुण मंडळी स्वराज्याच्या बाहेरच्या प्रदेशांतून सुवर्णाचा ओघ स्वदेशाकडे वळविण्यासाठीं सशस्त्र होऊन बाहेर पडे, त्याची ही पूर्वतयारी होती !

या शस्त्रपूजेच्या वेळचा **ध्यानमंत्र** पुढीलप्रमाणें आहे:—

**असिर्विनाशनःखड्गतीक्ष्णधारो दुरासदः ।**
**श्रीगर्भो विजयश्चैव धर्माधारस्तथैव च ॥ १ ॥**

बाकी उपचार इतर पूजेप्रमाणें अर्पावे.

## ५ श्रीसरस्वतीपूजा

ही सामान्यतः आश्विन शु॥ १० ( विजयादशमी किंवा दसरा ) या दिवशीं करतात. क्वचित् ९ मीच्या दिवशीं आवाहन, १० मीच्या दिवशीं पूजन व ११ ला विसर्जन असाही प्रघात आहे.

---

÷ ÷ कित्येकांच्या मतें या कुलधर्माचा संबंध 'रेणुका' मातेशीं असून तिचें मुख्य स्थान–माहुर–मातापूर हें आहे व वाणी–दिंडोरी आणि पुण्याजवळची चतुःशृंगी हीं तिर्थी उपस्थानें आहेत.

या दिवशीं पूजेसाठीं श्रीसरस्वतीचें प्रतीक पोथी वा पुस्तक याचा उपयोग करतात. लहान मुलाला प्रथमच 'पाटीवर घालण्या' ला (पाटीवर **श्रीगणेशायनमः** हीं अक्षरें काढून तिची पूजा करणें व तीं अक्षरें त्याला गिरवायला लावण्याला) हा मुहूर्त प्रशस्त मानलेला आहे.

सुप्रसिद्ध रविवर्म्यांनीं आपल्या कुंचल्यानें या सरस्वतीचें स्वरूप घरोघरीं पोंचविलें आहेच. तेव्हां त्याचाही आतां पूजेसाठीं उपयोग करण्याला हरकत नाहीं.

अलीकडे श्रीगणेशाप्रमाणेंच श्रीसरस्वतीची पार्थिव मूर्ति करून तिची श्रीगणेशाप्रमाणेंच सार्वजनिक पूजा करण्याचाही प्रघात पडला आहे.

ही पूजा श्रीगणेशपूजेप्रमाणेंच करावी. **ध्यानमंत्र** पुढीलप्रमाणें:—

**ॐ प्रणोदेवी सरस्वती वाजेभिर्वाजिनींवति ।**
**धीनाम वित्र्यवतु ॥ १ ॥**
**सुरासुरैः सेवितपंकजा करे विराजत् कमनीय पुस्तिका**
**विरिंचिपत्नी कमलासनस्थिता सरस्वती नृत्यतु वाचि**
**मे सदा ॥ १ ॥**
**या देवी सर्वभूतेषु श्रद्धारूपेण संस्थिता ।**
**नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नमः ॥**

श्रीगणेशमूर्तीच्या विसर्जनाप्रमाणेंच दुसरे दिवशीं (शु॥ ११ च्या दिवशीं व क्वचित् पुढें शु॥ १५ पर्यंत उत्सव चालल्यास त्या दिवशीं) संध्याकाळीं उत्तरपूजा करून या मूर्तीचे विसर्जन करतात.

उत्तरपूजा ही श्रीगणेशाच्या उत्तरपूजेप्रमाणेंच बहुधा पंचोपचारपूजा असते. आरत्या वगैरे म्हणून मंत्रपुष्प, प्रार्थना, इत्यादि झाल्यावर मूर्तीवर विसर्जनाच्या अक्षता वाहतांना पुढील मंत्र म्हणावा:—

**यान्तु देवगणाः सर्वे पूजामादाय पार्थिवीम् ।**
**इष्टकामप्रसिद्ध्यर्थं पुनरागमनाय च ॥ १ ॥**

# स्तोत्रपाठ

## १ श्रीकालिकास्तोत्रम्

[ अस्य श्रीकालिकास्तोत्रमंत्रस्य । सदाशिव ऋषिः । कालिका देवता । अनुष्टुभ् छंदः । श्रीकालिकास्तोत्रजपे विनियोगः । ]

ॐ कालिकाकालमाताच कालानलसमद्युतिः ।
कपर्दिनी करालास्या करुणामृतसागरा ॥ १ ॥
कृपामयी कृपाधारा कृपापारा कृपागमा ।
कृशानुः कपिला कृष्णा कृष्णानन्द विवर्धिनी ॥ २ ॥
कालशक्तिः कामरूपा कामपाशविमोचिनी ।
कादम्बिनी कलाधारा कलिकल्मषनाशिनीं ॥ ३ ॥
कुमारी पूजनप्रीता कुमारी पूजकालया ।
कुमारी भोजनानन्दा कुमारीरूपधारिणी ॥ ४ ॥
कदम्बवनसंचारा कदम्बवनवासिनी ।
कदम्बपुष्पसंतोषा कदंबापुष्पमालिनी ॥ ५ ॥
किशोरी कलकंटाच कलनादनिनादिनी ।
कादंबरीपानरता तथा कादंबरीप्रिया ॥ ६ ॥
कपालपात्रनिरता कङ्कालमाल्यधारिणी ।
कमलासनसंतुष्टा कमलासनवासिनी ॥ ७ ॥
कमलालयमध्यस्था कमलामोदमोदिनी ।
कलहंसगतिः क्लैब्यनाशिनी कामरूपिणी ॥ ८ ॥
कामरूपकृतावासा कामपीठविलासिनी ।
कमनीया कल्पलता कमनीयविभूषणा ॥ ९ ॥
कमनीयगुणाराध्या कोमलांगी कृशोदरी ।
कारणामृतसंतोषा कारणानंदसिद्धिदा ॥ १० ॥

कारणानन्दजापेष्टा कारणार्चनहर्षिता ।
कारणार्णवसमग्ना कारणाव्रतपालिनी ॥ ११ ॥
कस्तूरीसौरभामोदा कस्तूरीतिलकोज्ज्वला ।
कस्तूरीपूजनरता कस्तूरीपूजकप्रिया ॥ १२ ॥
कस्तूरीदाहजननी कस्तूरीमृगतोषिणी ।
कस्तूरीभोजनप्रीता कर्पूरचन्दनोक्षिता ॥ १३ ॥
कर्पूरकारणाल्हादा कर्पूरामृतपायिनी ।
कर्पूरसागरस्नाता कर्पूरसागरालया ॥ १४ ॥
कूर्चबीजजपप्रीता कूर्चजापपरायणा ।
कुलीना कौलिकाराध्या कौलिकप्रियकारिणी ॥ १५ ॥
कुलाचाराकौतुकिनी कुलमार्गप्रदर्शिनी ।
काशीश्वरी कष्टहर्त्री काशीशवरदायिनी ॥ १६ ॥
काशीश्वर कृतामोदा काशीश्वर मनोरमा ।
कलमंजिरचरणाक्कणत्काञ्ची विभूषणा ॥ १७ ॥
कांचनाद्रिकृतागारा कांचनाचलकौमुदी ।
कामबीजजपानंदा कामबीजस्वरूपिणी ॥ १८ ॥
कुमतिघ्ना कुलीनार्तिनाशिनी कुलकामिनी ।
क्रीं. ह्रीं. श्रीं. मंत्रवर्णेन कालकंटकघातिनी ॥ १९ ॥
इत्याद्या कालिकादेव्याः शतनामप्रकीर्तितम् ।
ककारकूटघटितं कालीरूपस्वरूपकम् ॥ २० ॥
पूजाकालेपठेद्यस्तु कालिकाकृतमानसः ।
मंत्रसिद्धिर्भवेदाशु तस्य काली प्रसीदति ॥ २१ ॥

## २. श्रीमहालक्ष्म्यष्टकम्

श्रीगणेशाय नमः ॥ इंद्र उवाच ।
नमस्तेऽस्तु महामाये श्रीपीठे सुरपूजिते ।
शंखचक्रगदाहस्ते महालक्ष्मि नमोऽस्तु ते ॥ १ ॥
नमस्ते गरुडारुढे कोलासुरभयंकरि ।
सर्वपापहरेदेवि महालक्ष्मि० ॥ २ ॥
सर्वज्ञे सर्ववरदे सर्वदुष्टभयंकरि ।
सर्वदुःखहरे देवि महालक्ष्मि० ॥ ३ ॥
सिद्धिबुद्धिप्रदे देवि भुक्तिमुक्तिप्रदायिनी ।
मंत्रमूर्ते सदा देवि महालक्ष्मि० ॥ ४ ॥
आद्यंतरहिते देवि आद्यशक्तिमहेश्वरी ।
योगज्ञे योगसंभूते महालक्ष्मि० ॥ ५ ॥
स्थूलसूक्ष्ममहारौद्रे महाशक्तिमहोदरे ।
महापापहरे देवि महालक्ष्मि० ॥ ६ ॥
पद्मासनस्थिते देवि परब्रह्मस्वरूपिणी ।
परमेशि जगन्मातर्महालक्ष्मि० ॥ ७ ॥
श्वेतांबरधरे देवि नानालंकारभूषिते ।
जगत्स्थिते जगन्मातर्महालक्ष्मि० ॥ ८ ॥
महालक्ष्म्यष्टकस्तोत्रं यः पठेद्भक्तिमान्नरः ।
सर्वसिद्धिमवाप्नोति राज्यं प्राप्नोति सर्वदा ॥ ९ ॥
एककालं पठेन्नित्यं महापापविनाशनम् ।
द्विकालं यः पठेन्नित्यं धनधान्यसमन्वितः ॥ १० ॥

त्रिकालं यः पठेन्नित्यं महाशत्रुविनाशनम् ।
महालक्ष्मीर्भवेन्नित्यं प्रसन्ना वरदा शुभा ॥ ११ ॥
इतींद्रकृतः श्रीमहालक्ष्म्यष्टकस्तवः संपूर्णः ॥

## ३ श्रीसरस्वती–श्रीभगवत्यष्टकम्

श्रीगणेशाय नमः ॥

नमोस्तुते सरस्वति त्रिशूलचक्रधारिणी ।
सितांबरावृते शुभे मृगेंद्रपीठसंस्थिते ॥
सुवर्णबंधुराधरे सुझल्लरीशिरोरुहे ।
सुवर्णपद्मभूषिते नमोस्तुते महेश्वरि ॥ १ ॥
पितामहादिभिर्नुते सकांतिलुप्तचंद्रभे ।
सरत्नमालयावृते भवाब्धिकष्टहारिणि ॥
तमालहस्तमंडिते तमालभालशोभिते ।
गिरामगोचरे इले नमोस्तुते महेश्वरि ॥ २ ॥
स्वभक्तवत्सलेऽनघे सदाऽपवर्गभोगदे ।
दरिद्रदुःखहारिणि त्रिलोकशंकरीधारि ॥
भवानि भीम अंबिके प्रचंडतेजउज्ज्वले ।
भुजाकलापमंडिते नमोस्तुते महेश्वरि ॥ ३ ॥
प्रपन्नभीतिनाशिके प्रसूनमाल्यकंधरे ।
धियस्तमोनिवारिके विशुद्धबुद्धिकारिके ॥
सुरार्चितांघ्रिपंकजे प्रचंड विक्रमेऽक्षरे ।
विशालपद्मलोचने नमोस्तुते महेश्वरि ॥ ४ ॥

हतस्त्वया स दैत्य धूम्रलोचनो यदा ।
रणे तदा प्रसूनवृष्टयस्त्रिविष्टपे सुरैः कृताः ॥
निरीक्ष्य तत्र ते प्रभामलज्जत प्रभाकर— ।
स्त्वये दयाकरे ध्रुवे नमोस्तुते महेश्वरि ॥ ५ ॥
ननाद केसरी यदा चचाल मेदिनी तदा ।
जगाम दैत्यनायकः स्वसेनया द्रुतं भिया ॥
सकोपकंपदच्छदे सचंडमुंडघातिके ।
मृगेंद्रनादनादिते नमोस्तुते महेश्वरि ॥ ६ ॥
कुचंदनार्चितालिके सितोष्णवारणाधरे ।
सशर्करानने वरे निशुंभशुंभमर्दिके ॥
प्रसीद चंडिके अजे समस्तदोषघातिके ।
शुभामतिप्रदेऽचले नमोस्तु ते महेश्वरि ॥ ७ ॥
त्वमेव विश्वधारिणी त्वमेव विश्वकारिणी ।
त्वमेव सर्वहारिणी न गम्यसेऽजितात्मभिः ॥
दिवौकसां हिते रता करोषि दैत्यनाशनं ।
शताक्षिरक्तदंतिके नमोस्तुते महेश्वरि ॥ ८ ॥
[ पठंति ये समाहिता इमं स्तवं सदा नरा ।
अनन्यभक्तिसंयुता अहर्मुखेऽनुवासरम् ॥
भवंति ते तु पंडिताः सुपुत्रधान्यसंयुताः ।
कलत्रभूतिसंयुता व्रजंति ते चामृतं सुखम् ॥ ९ ॥

इतिश्रीमद्रामदासपूज्यपादशिष्य श्रीमद्धंसदासशिष्येणआमरदा-
साख्य कविना विरचितं भगवत्यष्टकम् समाप्तम्

## ४ श्रीदुर्गादेवीस्तोत्रम्

श्रीगणेशाय नमः ॥

नगरीं प्रवेशले पंडुनंदन ॥ तों देखिलें दुर्गास्थान ॥
धर्मराज करी स्तवन ॥ जगदंबेचें तेधवां ॥ १ ॥
जय जय दुर्गे भुवनेश्वरी ॥ यशोदागर्भसंभव कुमारी ॥
इंदिरारमणसहोदरी ॥ नारायणी चंडिकांबिके ॥ २ ॥
जय जय जगदंबे भवानी ॥ मूळप्रकृति प्रणवरूपिणी ॥
ब्रह्मानंदपददायिनी ॥ चिद्विलासिनी जगदंबे ॥ ३ ॥
जयजय धराधर कुमारी ॥ सौभाग्यगंगे त्रिपुरसुंदरी ॥
हेरंबजननी अंतरीं ॥ प्रवेशें तूं आमुचिया ॥ ४ ॥
भक्तहृदयारविंदभ्रमरी ॥ तुझिया कृपावलोकनें निर्धारीं ॥
अतिमूढ तो निगमार्थ करी ॥ काव्यरचना अद्भूत ॥ ५ ॥
तुझिया अपांगतें करून ॥ जन्मांधासी येती नयन ॥
पांगूळ धावे पवनाहून ॥ करी गमन त्वरेनें ॥ ६ ॥
जन्मादारभ्य जो मुका ॥ होय वाचस्पतीसम बोलका ॥
तूं स्वानंदसरोवरमराळिका ॥ होसी भाविकां सुप्रसन्न ॥ ७ ॥
ब्रह्मानंदें आदिजननी ॥ तव कृपेची नौका करूनी ॥
दुस्तर भवसिंधु लंघोनी ॥ निवृत्तितटा नेईजे ॥ ८ ॥
जय जय आदिकुमारिके ॥ जयजय मूळपीठनायिके ॥
सकल सौभाग्यदायिके ॥ जगदंबिके मूळप्रकृति ॥ ९ ॥
जय जय भर्गप्रिय भवानी ॥ भवनाशके भक्तवरदायिनी ॥
समुद्रकारके हिमनगनंदिनी ॥ त्रिपुरसुंदरी महामाये ॥ १० ॥

जय आनंदकासारमराळिके ।। पद्मनयने दुरितकाननपावके
त्रिविधताप भवमोचके ।। सर्वव्यापके मृडानी ।। ११ ।।
शिवमानसकनकलतिके ।। जय चातुर्यचंपककलिके ।।
शुंभनिशुंभदैत्यांतके ।। निजजनपालके अपर्णे ।। १२ ।।
तव मुखकमलशोभा देखोनी ।। इंदुबिंब गेलें गळोनी ।।
ब्रह्मादिक बाळें तान्हीं ।। स्वानंदसदनीं निजविसी ।।१३।।
जीव शिव दोन्ही बालकें ।। अंबे तुवां निर्मिलीं कौतुकें ।।
जिवा तुझें स्वरूप नोळखे ।। म्हणोनि पडले आवर्ती ।।१४।।
शिव तुझे स्मरणीं सावचित्त ।। म्हणोनि अंबे तो नित्यमुक्त ।।
स्वानंदपद हातासी येत ।। कृपें तुझ्या जननीये ।। १५ ।।
मेळवूनि पंचभूतांचा मेळ ।। तुवां रचिला ब्रह्मांडगोळ ।।
इच्छा परततां तात्काळ ।। क्षणांत निर्मूळ करिसी तूं ।।१६।।
अनंतबालसूर्यश्रेणी ।। तव प्रभेमाजीं गेल्या विरोनी ।।
सकलसौभाग्यशुभकल्याणी ।। रमारमणे वरप्रदे ।। १७ ।।
शंबरारिरिपुवल्लभे ।। त्रैलोकनगरारंभस्तंभे ।।
आदिमाये आदिप्रभे ।। सकलारंभे मूळप्रकृती ।। १८ ।।
जय जय करुणामृतसरिते ।। निजभक्तपालके गुणभरिते ।।
अनंतब्रह्मांडपालके कृपावंते ।। आदिमाये अपर्णे ।। १९ ।।
सच्चिदानंदप्रणवरूपिणी ।। चराचरजीवसकलव्यापिनी ।।
सर्गस्थित्यंतकारिणी ।। भवमोचनी महामाये ।। २० ।।
ऐकोनि धर्मराजाचें स्तवन ।। दुर्गादेवी झाली प्रसन्न ।।
म्हणे तव शत्रु संहारून ।। राज्यीं स्थापीन धर्मा तूतें ।।२१।।

तुम्हीं वास करावा येथें ।। प्रकटों नेदी जनातें ।।
शत्रुक्षय पावती तुमचे हातें ।। सुख अद्‌भुत तुम्हां होय ।।२२।।
तुवां जें केलें स्तोत्रपठण ।। हें जो करील पठण श्रवण ।।
त्यासी सर्वदा रक्षीन ।। अंतर्बाह्य निजांगें ।। २३ ।।

इति श्रीदुर्गास्तोत्र समाप्तम् ।।

## पुरुषसूक्तम्

।। श्रीगणेशाय नमः ।।ॐसहस्रशीर्षापुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्।। सभूमिंविश्वतोवृत्वात्यतिष्ठद्दशांगुलम् ।। पुरुषएवेदंसर्वंयद्भूंयच्च-भव्यम् ।। उतामृतत्वस्येशानोयदन्नेनातिरोहति ।। एतावानस्य-महिमातोज्यायांश्चपूरुषः ।। पादोस्यविश्वाभूतानित्रिपादस्यामृतं-दिवि ।। त्रिपादूर्ध्वउदैत्पुरुषः पादोस्येहाभवत्पुनः ।। ततोविष्वङ्-व्यक्रामत्साशनानशनेअभि ।। तस्माद्विराळजायतराविराजोअधि-पूरुषः ।। सजातोअत्यरिच्यतपश्चाद्भूमिमथोपुरः ।।१।। यत्पुरुषेण हविषादेवायज्ञमतन्वत ।। वसंतोअस्यासीदाज्यंग्रीष्मइध्मः शर-द्धविः ।। तंयज्ञंबर्हिषिप्रौक्षन्पुरुषंजातमग्रतः ।। तेनदेवाअयजंत-साध्याऋषयश्चये ।। तस्माद्यज्ञात्सर्वहुतः संभृतंपृषदाज्यम् ।। पशून्ताँश्चक्रेवायव्यानारण्यान्ग्राम्याश्चये ।। तस्माद्यज्ञात्सर्वहुत-ऋचः सामानिजज्ञिरे ।। छंदांसिजज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ।। तस्मादश्वाअजायंतयेकेचोभयादतः ।। गावोहजज्ञिरेतस्मात्तस्मा-ज्जाताअजावयः ।। २ ।। यत्पुरुषंव्यदधुः कतिधाव्यकल्पयन् ।। मुखंकिमस्यकौबाहूकाऊरूपादाउच्येते ।। ब्राह्मणोस्यमुखमासीद्बा-हूराजन्यः कृतः ।। ऊरूतदस्ययद्वैश्यः पद्भ्यांशूद्रोअजायत ।।

चंद्रमामनसोजातश्चक्षोः सूर्योअजायत ।। मुखादिंद्रश्चाग्निश्चप्राणा-
द्वायुरजायत ।। नाभ्याआसीदंतरिक्षंशीर्ष्णोद्यौः समवर्तत ।।
पद्भ्यांभूमिर्दिशः श्रोत्रात्तथालोकाँअकल्पयन् ।। सप्तास्यासन्परि-
धयस्त्रिःसप्तसमिधः कृताः ।। देवायद्यज्ञंतन्वानाअबध्नन्पुरुषं पशुम् ।।
यज्ञेनयज्ञमयजंतदेवास्तानिधर्माणिप्रथमान्यासन् ।। तेहनाकंमहि-
मानः सचंतयत्रपूर्वेसाध्याः संतिदेवाः ।। ३ ।।

## विष्णुसूक्तम्

[ या पुरुषसूक्ताला जोडूनच सहा ऋचांचें एक विष्णुसूक्त आहे. तेंही पुरुषसूक्ताबरोबरच म्हणतात तें असेंः—]

ॐ अतो देवा अवन्तु नो यतो विष्णुर्विचक्रमे ।
पृथिव्याः सप्तधामभिः ।।
इदं विष्णुर्विचक्रमे त्रेधा निदधे पदं ।
समूहळमस्यपांसुरे ।।
त्रीणि पदा विचक्रमे विष्णुर्गोपा अदाभ्यः ।
अतो धर्माणि धारयन् ।।
विष्णोः कर्माणि पश्यत यतो व्रतानि पस्पशे ।
इन्द्रस्य युज्यः सखा ।।
तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः ।
दिवीव चक्षुराततम् ।
तद्विप्रासो विपन्यवो जागृवांसः समिन्धते ।
विष्णोर्यत् परमं पदम् ।।

( अभिषेकाच्या वेळीं हीं दोन्हीं सूक्तें म्हणून झाल्यावर शेवटीं)

ॐ देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्या-मग्नेस्तेजसा सूर्यस्य वर्चसेन्द्रस्येंद्रियेणाभिषिञ्चामि । बलाय श्रियै यशसेऽन्नाद्याय । ॐ भूर्भुवःस्वः अमृताभिषेकोऽस्तु । शान्तिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

असा घोष करतात.

## श्रीसूक्तम्

[ हें श्रीदेवीस्तुतिपर सूक्त आहे. विविध नांवांच्या श्रीआदिशक्तीच्या आराधनप्रसंगीं अभिषेकाच्या वेळीं या सूक्ताचाच उपयोग करतात. विशेष आराधनेसाठीं याच्या १६ आवृत्ती म्हणतात. त्यावेळीं पहिले तीन वर्ग १६ वेळां म्हणून झाल्यावर "यःशुचिः०' पासूनची फलश्रुति शेवटीं एकदांच म्हणतात. ]

हरि ॐ ॥ हिरण्यवर्णांहरिणींसुवर्णरजतस्रजाम् ॥ चंद्रां हिरण्मयीं लक्ष्मींजातवेदोमआवह ॥ तांमआवहजातवेदोलक्ष्मी-मनपगा मिनीम् ॥ यस्यांहिरण्यंविंदेयंगामश्वंपुरुषानहम् ॥ अश्व पूर्वांरथमध्यांहस्तिनाद-प्रबोधिनीम् ॥ श्रियंदेवीमुपव्हयेश्रीर्मादेवी-जुषताम् ॥ कांसोस्मितांहिरण्यप्राकारामार्द्रांज्वलंतींतृप्तांतर्पयंतीम् ॥ पद्मेस्थितांपद्मवर्णांतामिहोपव्हयेश्रियम् ॥ चंद्रांप्रभासांयशसा-ज्ज्वलंतींश्रियंलोकेदेवजुष्टामुदाराम् ॥ तांपद्मिनीमींशरणमहं-प्रपद्येऽलक्ष्मीर्मेनश्यतांत्वांवृणे ॥१॥ आदित्यवर्णेतपसोधिजातो-वनस्पतिस्तववृक्षोथबिल्वः ॥ तस्यफलानितपसानुदंतुमायांतरा-याश्चबाह्याअलक्ष्मीः ॥ उपैतुमांदेवसखः कीर्तिश्चमणिनासह ॥ प्रादुर्भूतोसुराष्ट्रेस्मिन्कीर्तिमृद्धिंददातुमे ॥ क्षुत्पिपासामलां-

ज्येष्ठामलक्ष्मींनाशयाम्यहम् ॥ अभूतिमसमृद्धिंचसर्वांनिर्णुदमे-
गृहात् ॥ गंधद्वारांदुरावर्षांनित्यपुष्टांकरीषिणीं ॥ ईश्वरींसर्वभूता-
नांतामिहोपव्हयेश्रियम् ॥ मनसःकाममाकूर्तिवाचःसत्यमशीमहि ॥
पशूनांरूपमन्नस्यमयिश्रीः श्रयतांयशः ॥ २ ॥ कर्दमेनप्रजाभूता-
मयिसंभवकर्दम ॥ श्रियंवासयमेकुलेमातरंपद्ममालिनीम् ॥ आपः
स्रजंतुस्निग्धानिचिक्लीतवसमेगृहे ॥ निचदेवींमातरांश्रियंवासयमे-
कुले ॥ आर्द्रांयःकरिणींयष्टिंसुवर्णांहेममालिनीम् ॥ सूर्यांहिरण्मयीं-
लक्ष्मींजातवेदोमआवह ॥ आर्द्रांपुस्करिणींपुष्टिंपिंगलांपद्ममालि-
नीम् ॥ चंद्रांहिरण्मयींलक्ष्मींजातवेदोमआवह ॥ तांमआवहजात-
वेदोलक्ष्मीमनपगामिनीं ॥ यस्यांहिरण्यंप्रभूतंगावोदास्योश्वान्-
विंदेयंपुरुषानहम् ॥ ३ ॥ यः शुचिः प्रयतोभूत्वाजुहुयादाज्य-
मन्वहं ॥ सूक्तंपंचदशर्चंचश्रीकामःसततंजपेत् ॥ पद्माननेपद्मऊरू-
पद्माक्षीपद्मसंभवे ॥ तन्मेभजसिपद्माक्षि येन सौख्यंलभाम्यहम् ॥
अश्वदायैगोदायैधनदायैमहाधने ॥ धनंमेलभतांदेविसर्वकामांश्चदे-
हिमे ॥ पद्माननेपद्मविपद्मपत्रेपद्मप्रियेपद्मदलायताक्षि ॥ विश्वप्रिये-
विश्वमनोनुकूलेत्वत्पादपद्मंमयिसंनिधत्स्व ॥ पुत्रपौत्रधनंधान्यं-
हस्त्यश्वादिगवेरथम् ॥ प्रजानांभवसीमातांआयुष्मतंकरोतुम ॥
धनमग्निर्धनंवायुर्धनंसूर्योधनंवसुः ॥ धनमिन्द्रोबृहस्पतिर्वरुणंध-
नमस्तुमे ॥ वैनतेयसोमंपिबसोमंपिबतुवृत्रहा ॥ सोमंधनस्यसो-
मिनोमह्यंददातुसोमिनः ॥ न क्रोधो नच मात्सर्यं न लोभो
नाशुभामतिः ॥ भवंतिकृतपुण्यानां भक्तानां श्रीसूक्तं जपेत् ॥
सरसिजनिलये सरोजहस्ते धवलतरां शुकगंधमाल्यशोभे ॥
भगवतिहरिवल्लभे मनोज्ञे त्रिभुवनभूतिकरि प्रसीद मह्यम् ॥

विष्णुपत्नीं क्षमां देवीं माधवीं माधवप्रियाम् ॥ लक्ष्मीं प्रियसखीं देवीं नमाम्यच्युतवल्लभाम् ॥ महालक्ष्मीच विद्महे विष्णुपत्नीच धीमहि ॥ तन्नोलक्ष्मीः प्रचोदयात् ॥ श्रीवर्चस्वमायुष्यमारोग्यमाविधात् शोभमानं महीयते ॥ धानंधन्यं बहुपुत्रलाभं शतसंवत्संत्सरंदीर्घमायुः ॥

## आरत्या

[ आरती म्हणजे देवपूजेच्या वेळीं—बहुधा शेवटीं त्या त्या देवतेच्या स्तुतिपर व प्रार्थनापर केलेलें कवन. हें विशिष्ट वृत्तांत रचलेलें असून विशिष्ट रागदारीवर म्हणावयाचें असतें. प्रस्तुत देवतांना उद्देशून म्हटल्या जाणाऱ्या सामान्य आरत्या पुढें दिल्या आहेत.

कोणत्याही देवतेची शास्त्रोक्त पूजा करतांना प्रथम श्रीगणेशपूजन व वन्दन करण्याच्या प्रथेला अनुसरून त्या पूजनाच्या शेवटीं म्हणावयाच्या आरत्यांतही श्रीगणेशाची आरती प्रथम म्हणून नंतर त्या त्या विशिष्ट देवतेची आरती म्हणण्याची चाल आहे. तिला अनुसरून श्रीगणपतीची आरती इथें प्रथम दिली आहे. ]

### १ आरती गणपतीची

सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची ॥ नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची ॥
सर्वांगी सुंदर उटि शेंदुराची ॥ कंठीं झळके माळ मुक्ताफळांची ॥ १ ॥
जय देव जय देव जय मंगळमूर्ती ॥ दर्शनमात्रें मनकामना पुरती ॥ ध्रु० ॥
रत्नखचित फरा तुज गौरीकुमरा । चंदनाची उटि कुंकुमकेशरा ॥
हिरेजडित मुगुट शोभतो बरा । रुणझुणती नूपुरें चरणीं घागरिया ॥२॥
लंबोदर पीतांबर फणिवरबंधना ॥ सरळसोंड वक्रतुंड त्रिनयना ॥
दास रामाचा वाट पाहे सदना । संकष्टीं पावावें निर्वाणीं रक्षावें सुरवरवंदना ॥ ३ ॥

## २ आरती देवीची

दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारी । अनाथनाथे अंबे करुणा विस्तारी वारीं वारीं जन्ममरणाते वारीं । हारीं पडलों आतां संकट निवारीं ॥ १ ॥ जय देवी जय देवी महिषासुरमथिनी ॥ सुरवरईश्वरवरदे तारकसंजिवनी ॥ ध्रु० ॥ त्रिभुवनभुवनीं पाहतां तुजऐशी नाहीं । चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं । साही विवाद करितां पडिले प्रवाहीं । ते तूं भक्तांलागीं पावसि लवलाहीं ॥ २ ॥ प्रसन्नवदने प्रसन्न होसी निजदासां । क्लेशापासुनि सोडीं तोडीं भवपाशा । अंबे तुजवांचून कोण पूरविल आशा ॥ नरहरि तल्लिन झाला पदपंकज लेशा ॥ ३ ॥

## ३ आरती श्रीमहाकाली–महालक्ष्मीची

जय अंबे जगदंबे जय जय महाकाली ।
आरती ओवाळूं, पंचारती ओवाळूं, वंदूं पद भाळीं ॥ ध्रु० ॥

जगतारिणि, दुःखहारिणि, कुलस्वामिनी माते ।
नाना विघ्नें वेष्टुनि कष्टविती मातें ॥
करुणा करिं शांकरि तूं अनाथजननाथे ।
भवभय सर्वहि हरिसी हें तों तव नातें ॥ १ ॥

बौद्धरूप दैवत या कलिमाजीं आलें ।
न मिळे फळ वांच्छित शंकित मन झालें ॥
तूं एक जागृत ऐकुनि मन माझें धालें ।
जडलें दृढ मम मानस निश्चल नाहालें ॥ २ ॥

तवगुणप्रताप अद्‌भुत ऐकुनियां कानीं ।
ध्यानीं मनिं दिनरजनिं स्तवितों निर्वाणीं ॥
लज्जा राखीं माते हे शुभकल्याणी ।
कृपाकटाक्षें लक्ष्मी रक्षीं तव चरणीं ॥ ३ ॥

निर्जर मुनिवर सर्वहि तुजलागीं ध्याती ।
केली त्या कैवारें दैत्यांवर ख्याती ॥
मर्दन शुंभ निशुंभां महिषासुर जाती ।
सप्तशतीचा महिमा मृकुंडसुत गाती ॥ ४ ॥

जिवजंतू मम किंतु जाणसि सर्वांचा ।
अंतरसाक्ष तूं हेतु कां न कळे अमुचा ॥
संचित–क्रियमाणा जरि मानूं मुळ सांचा ।
तरि मम काय पराक्रम वदला मुनि त्याचा ॥ ५ ॥

विज्ञप्ती श्रुत व्हावी सादर सुखशाली ।
बद्धांजुलि विनवितों विनतीच्या चालीं ॥
सुंदर पदपंकरजीं रखमा मिठि घाली ।
षट्पदवत गुंजारव करितो भौंताली ॥ ६ ॥

## ४ आरती श्रीकालिकाम्बेची

ओवाळूं आरती कालिका अंबा । कालिका अंबा ।
मागेंपुढें पाहूं जातां अवघी जगदंबा ॥ ध्रु० ॥

आदिमध्यअवसानीं व्यापक होसी । अंबे, व्यापक होसी ।
अणुरेणु जीव तूझा वेया न त्यागिसी ॥ १ ॥

भास हो आभास जीचा सौरस सारा । अंबे, सौरस सारा ।
सारासार निवडूं जातां न दिसे थारा ॥ २ ॥

कलातीत कलानिधि + पर्वतीं ठाण । अंबे, पर्वतीं ठाण ।
भक्त शिवाजीसी दिधलें पूर्ण वरदान ॥ ३ ॥

चिच्छक्ते चिन्मात्रे चित्त चैतन्य बाळे । अंबे, चैतन्य बाळे ।
विठ्ठल सुतात्मजासी दावीं पूर्ण सोहळे ॥ ४ ॥

+ 'कलानिधि' नांवाचा डोंगर बेळगांव जिल्ह्यांत आहे.

## ५ आरती श्रीमहालक्ष्मीची

जय देवी जय देवी जय महालक्ष्मी ।
वससी करवीरीं तूं विश्वाच्या पक्ष्मीं ॥ ध्रु० ॥

श्रीपति तुझिया योगें श्रीहरिला नाम ।
ब्रह्मादिकहीं ध्याती पुरविसि तत्काम ॥
निष्कामें जे भजतीं पावति निजधाम ।
योगी ध्यानें पावति पद आत्माराम ॥ १ ॥

तप तप सिद्धी तुजविण कांहीं साधेना ।
प्रसन्न होतां भक्तां भवभय बाधेना ॥
तुजवांचुनियां अंबे शांती लाधेना ।
वेदान्तींचें सारहि शिष्यां बाधेना ॥ २ ॥

गर्जति निगमागमपरि वाणीला गौप्प ।
जें जें वर्णिति तें तें माये तव रूप ॥
कोण करी मग तूझ्या सगुणत्वा माप ।
स्तवितां सहस्रवदनी श्रमला कीं साप ॥ ३ ॥

दंभें दर्पें मानें क्रोधें जे रहित ।
भजती तव चरणां त्यां साधे आत्महित ॥
उद्धरती ते प्राणी परिवारांसहित ॥
देवी त्याला करिसी श्रीपति-सान्निहित ॥ ४ ॥

बाधा भवभीतीची तव दासां नाहीं ।
माये न करिसि मोहा चंचळ तें कांहीं ॥
हृदयीं अखंड माझ्या तूं सदये राहीं ।
गोविन्दात्मजविप्रा स्वपदासी पाहीं ॥ ५ ॥

## ६ आरती नवरात्राची

आश्विनशुद्धपक्षीं अंबा बैसलि सिंहासनीं हो । प्रतिपदेपासून घटस्थापना ती करुनी हो ॥ मूलमंत्रजप करुनि भोंवते रक्षक ठेउनी हो ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र आईचें पूजन करिती हो ॥ १ ॥ उदो बोला उदो अंबाबाई माउलीचा हो ॥ उदोकारें गर्जति काय महिमा वर्णूं तिचा हो ॥ ध्रु० ॥ द्वितीयेचे दिवशीं मिळती चौसष्ट योगिनी हो ॥ सकळांमध्यें श्रेष्ठ परशुरामाची जननी हो ॥ कस्तुरीमळवट भांगीं शेंदूर भरुनी हो ॥ उदोकारें गर्जति सकल चामुंडा मिळुनि हो ॥ उदो० ॥ २ ॥ तृतीयेचे दिवशीं अंबे शृंगार मांडिला हो ॥ मळवट पातळ चोळी कंठीं हार मुक्ताफळां हो ॥ कंठींचीं पदकें कांसे पीतांबर पिंवळा हो ॥ अष्टभुजा मिरवती अंबे सुंदर दिसे लीला हो ॥ उदो० ॥ ३ ॥ चतुर्थीच्या दिवशीं विश्वव्यापक जननी हो ॥ उपासकां पाहसी प्रसन्न अंतःकरणीं हो ॥ पूर्णकृपें जगन्माते मनमोहिनी हो ॥ भक्तांच्या माउली सुर ते येती लोटांगणीं हो ॥ उदो० ॥ ४ ॥ पंचमीचे दिवशीं व्रत तें उपांगललिता हो ॥ अर्घ्यपाद्यपूजनें तुजला भवानी स्तविती हो ॥ रात्रीचे समयीं करिती जागरण हरिकथा हो ॥ आनंदें प्रेम तें आलें सद्भावें क्रीडतां हो ॥ उदो० ॥ ५ ॥ षष्ठीचे दिवशीं भक्तां आनंद वर्तला हो ॥ घेउनि दिवट्या हस्तीं हर्षे गोंधळ घातला हो ॥ कवडी एक अर्पितां देशी हार मुक्ताफळां हो ॥ जोगवा मागतां प्रसन्न झाली भक्तकुळा हो ॥ उदो० ॥ ६ ॥ सप्तमीचे दिवशीं सप्तशृंगगडावरी हो ॥ तेथें तूं नांदसी भोंवतीं पुष्पें नानापरी हो ॥ जाईजुईसेवंती पूजा रेखियली बरवी हो ॥ भक्त संकटीं पडतां झेलुनि घेसी वरचेवरी हो ॥ उदो० ॥ ७ ॥ अष्टमीचे दिवशीं अष्टभुजा नारायणी हो ॥ सह्याद्रिपर्वतीं पाहिली उभी जगज्जननी हो ॥ मन माझें मोहिलें शरण आलों तुजलागुनी हो ॥ स्तनपान देउनी सुखी केलें अंतःकरणीं हो ॥ उदो० ॥ ८ ॥ नवमीचे दिवशीं नवदिवसांचें

पारणें हो ॥ सप्तशतीजप होमहवनें सद्भक्तीकरुनी हो ॥ षड्रसअन्नें नैवेद्यासी अर्पियलीं भोजनीं हो ॥ आचार्य ब्राह्मणां तृप्त केलें त्वां कृपेंकरुनी हो ॥ उदो० ॥ ९ ॥ दशमीच्या दिवशीं अंबा निघे सीमाउल्लंघनीं हो ॥ सिंहारूढ करीं सबळ तीं शस्त्रें अंबे त्वां घेउनी हो ॥ शुंभनिशुंभादिक राक्षसां किती मारिसी रणीं हो ॥ विप्रा रामदासा आश्रय दिधला तो चरणीं हो ॥ उदो बोला० ॥ १० ॥

### ७ काकडे आरती श्रीजगदंबेची

काकडे आरती तुजला जगदंबे शांते,
तुजला जगदंबे शांते ।
महाकाली–महालक्ष्मी जय सरस्वती माते ॥ ध्रु० ॥
मधुकैटभमार्दिनी शुंभनिशुंभ निर्दालिनी ।
अघनगसंहारिणी दयाले-सुर-मुनि-परि-
पालिनी ॥ काकडे आरती० ॥ १ ॥
महिषासुरमार्दिनी भवानी चंडमुंडघातिनी ।
चिच्छक्ते चिन्मात्रे चित्तचालक
नारायणी ॥ काकडे० ॥ २ ॥
गोब्राह्मण छळितांचि कलियुगीं दैत्यांशीं यवनीं ।
तूंचि करिसी निःपात तयांचा शिवनृप-
वरदायिनी ॥ काकडे० ॥ ३ ॥
धर्मग्लानी दैन्य दुःखही दूर कराया क्षणीं ।
नानारूपीं अवतरसी तूं ताराया अवनीं ॥
काकडे आरती० ॥ ४ ॥
शत्रुबुद्धिसी मोह, सन्मती पसरविं अमुच्या जनीं ।

निजपदकमलीं रमावें भवानीदास
रात्रंदिनीं ॥ काकडे आरती० ॥ ५ ॥

श्रीजगदंब ! जगदंब ! जगदंब !
उदयोस्तु !

## ८ आरती श्रीदुर्गादेवीची

जय जय दुर्गे माते शांते चिच्छक्ते ॥ पंचारति ओंवाळू तव पदिं कुळनाथे ॥ध्रु०॥ स्वेच्छें ब्रह्म तूं स्फुरणीं प्रगटसी मुळमाये ॥ विधिहरिहर हीं बाळें निर्मुनि भुवना ये ॥ उत्पत्तिरक्षणप्रळयां निरउनि सम पाये । प्रकृतिपुरुषात्मक तूं वर्तसि इह न्यायें ॥ जय० ॥१॥ ब्रह्मभुवनानिजवासा भक्तांस्तव त्यजुनी ॥ निशुंभशुंभादिक हे दानव संहरुनी ॥ क्रीडसि सर्वाभ्यंतरीं तुरिये उन्मनी ॥ अपार तव गुण किति हे वर्णु मी लघुवदनी ॥ जय० ॥ २ ॥ देवी शांतादुर्गा ऐशा अभिधानीं केळोसीपुर येथें प्रसन्न राहोनी ॥ निजद्विजभजकां स्मरणीं रक्षिसी धांवोनी ॥ अनुचर मंगेशात्मज अनन्य तव चरणीं ॥ जय जय दुर्गे माते शांते० ॥ ३ ॥

## ९ आरती श्रीतुळजाभवानीची

जयदेव जयदेव जय विश्वंभरिते ।
आरती ओंवाळूं तुळजे गुणसरिते ॥ ध्रु० ॥
सुरवरवरदायिनि मुरहरसुखसदना ।
परतरपरवासिनी अरिकुलरिपुकदना ।
व्यापक सर्वांघटीं जननी हे मदना ।
करुणासागर रूपें जागर शिशुवदना ॥
॥ जय देव० ॥ १ ॥

सकळासंजीवनी मुनिजनमनमोहिनी ।
जनमन विजन सज्जन मज्जन तमशमनी ।

दासा अभ्यंतरीं मानस मृगशयनी ।
राघव वरदा सुंदर लाघव मृगनयनी ॥
॥ जय देव० ॥ २ ॥

## १० नमन व प्रार्थना

घालीन लोटांगण । वंदीन चरण । डोळ्यांनीं पाहिन रूप तुझें ॥ प्रेमें आलिंगिन । आनंदें पूजिन । भावें ओंवाळीन म्हणे नामा । त्वमेव माता पिता त्वमेव त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव । त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव । त्वमेव सर्वं मम देवदेव । कायेन वाचा मनसेन्द्रियैर्वा बुद्ध्यात्मना वा प्रकृतिस्वभावात् ॥ करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयामि ॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरि । श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥

हरे राम हरे राम राम राम हरे हरे
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥

**उदयोऽस्तु ! जय जगदंब**

# बया दार उघड, दार उघड !

[ व्यक्ति आणि समाज स्वतः बलवान असल्याशिवाय किंवा झाल्याशिवाय दुष्टदमन आणि सुष्ट संरक्षणाचें कार्य होत नाहीं. हें बल प्राप्त होण्याला मनोभावानें शक्तिदेवीची उपासना करणें हें एक महत्त्वाचें साधन आहे. पौराणिक कालांत काय किंवा ऐतिहासिक कालांत काय या शक्तिदेवीचा वरप्रसाद मिळाला तेव्हांच अधर्माचा मोड होऊन धर्मसंस्थापना झाल्याचें दिसून येतें. अशा या शक्तिदेवीची पौराणिक कालांतील उदाहरणें देऊन इथें प्रार्थना केली आहे आणि त्यांत महाराष्ट्रांतील या देवीची प्रमुख स्थलें व नांवें यांचाही समावेश झाला आहे.

श्री एकनाथ महाराजांचें हें प्रार्थनास्तोत्र गोंधळी लोकांच्या चालीवर रचलेलें आहे. पंढरपूरच्या श्रीविठ्ठलाला **विठोबा** म्हणून हाक मारतात त्याच धर्तीवर या जगदंबेला इथें **बया** या घरगुती व प्रेमळ नांवानें संबोधलेलें असून प्रचलित असलेल्या तिच्या पूजाविधींतील अंगोपांगांचें रूपकात्मक वर्णन केलें आहे. ]

नमो आदिमाया भगवती । अनादिसिद्ध मूळप्रकृति ।
महालक्ष्मी त्रिजगतीं । बया दार उघड बया दार उघड ॥ १ ॥

हरिहर तुझें ध्यान करिती । चंद्रसूर्य कानीं तळपती ।
गगनाचें प्रावर्ण रुळती । तारांगणें भांगीं भरिलें मोतीं ।
बया दार उघड दार उघड ॥ २ ॥

नवखंड पृथ्वी तुझी चोळी । सप्तपाताळीं पाउलें गेलीं ।
एकवीस स्वर्ग मुगुटीं झळाळी । दार उघड बया ॥ ३ ॥

अलक्ष्यपुर भवानी । दार उघड बया ॥
माहूरलक्ष्मी । दार उघड बया ॥
कोल्हापूरलक्ष्मी । दार उघड बया ॥
तैलंगलक्ष्मी । बया दार उघड ॥
तुळजापूर लक्ष्मी । दार उघड बया ॥

कानाडलक्ष्मी । दार उघड बया ॥
अष्टभुजालक्ष्मी । दार उघड बया ॥
पंढरपुरनिवासिनी । दार उघड बया ॥
उदो उदो उदो उदो ॥ ४ ॥

चारी पुरुषार्थ गोंधळी । सनकादिक तेथें संबळी ।
तेहतीस कोटी भूतावळी । अठ्यायशीं सहस्र ऋषिमंडळी ।
दिवट्या पाजळोनी तिष्टती । दार उघड बया दार उघड ॥ ५ ॥

वेताळ फेताळ खंकाळ । मेसको मारको भैराळ ।
जागाई जोखाई क्षेत्रपाळ । म्हैशासुर दैत्य मातला सबळ ।
अबबब पीडा केली अंबे । बया दार उघड ॥ ६ ॥

मच्छाई बया दार उघड । कच्छाई बया दार उघड ।
वऱ्हाडी बया दार उघड । नरसाई बया दार उघड ।
वामनाई बया दार उघड । परसाई बया दार उघड ।
रामाई बया दार उघड । कृष्णाई बया दार उघड ।
बौद्धाई बया दार उघड । कलंकाई बया दार उघड ॥
महालक्ष्मी बया दार उघड । उदो उदो ऐसा शब्द गाजतो ।
कामक्रोध दैत्यांवर कोरडा कडकडां वाजतो
ज्ञानपोत पाजळतो । बोधपरडी हातीं घेतो ।
प्रेमाचा पाऊल पुढें ठेवितो । अहंशंखासुर दैत्य बळी देतो ॥
बया दार उघड ॥ ७ ॥

---

